॥ श्री दत्त प्रसन्न ॥

# हरिश्चंद्र

[ तीन अंकी पौराणिक संगीत नाटक ]

—: लेखक :—

कै. बाबाजीराव राणे

[ राजापूरकर नाटक मंडळी ]

रामकृष्ण प्रकाशन मंडळ, मुंबई १४

किंमत १।। रुपया



आवृत्ति ५ वी : फेब्रुवारी १९५५

प्रती : ११००

: प्रकाशक :
कृ. ना. सापळे,
रामकृष्ण प्रकाशन मंडळ,
त्रिभुवन रोड, मुंबई ४

: मुद्रक :
कृ. ना. सापळे,
रामकृष्ण प्रिं. प्रेस,
मोरबाग रोड, मुंबई १४

## प्रकाशकाचे दोन शब्द

राजापूरकर नाटक मंडळीच्या रंगभूमीवर जीं कांहीं नाटकें गाजलीं त्यांपैकींच एक **संगीत हरिश्चंद्र** हें नाटक आहे. भारतीय संस्कृतीचा परिचय सर्व थरांतून व्हावा यासाठीं कीर्तन-प्रवचनादि मार्गांनीं चाललेल्या प्रयत्नांचें परिणत स्वरूप म्हणजे पौराणिक नाटकें. जुन्या जमान्यांतील या नाटकांचें वैशिष्ट्य असें कीं, मूळ कथानक जसेंच्या तसें पुढें मांडावयाचें. त्या कथानकाला चालू घडीच्या चौकटींत बसवून कांहीं संदेश ध्वनित करण्याची प्रवृत्ति या प्रकारच्या नाटकांत आढळत नाहीं. म्हणून जुनी पौराणिक नाटकें भारताच्या बहुसंख्य जनतेला आपलींशीं वाटतात. आज हीं नाटकें दुर्मिळ झालीं आहेत. भारतीय संस्कृति सर्वांना आकलन व्हावी यासाठीं या दुर्मिळ नाटकांचें प्रकाशन अवश्य आहे आणि म्हणूनच '**हरिश्चंद्र**' हें कै. बाबाजीराव राणे यांचें नाटक आम्ही प्रकाशित करीत आहों. जनताजनार्दनाला तें मान्य होवो.

--**प्रकाशक**

॥ दत्त प्रसन्न ॥

# संगीत हरिश्चंद्र नाटक

## अंक पहिला

### नांदी

वन्दे पद्कमल विमल । अमल अखिल श्रीमंगल ॥ भव नभसम बहु दुर्गम । अति लघुतम नृविहंगम ॥ लंघानार्थ धरिला न दम । परि करि तव नाम सुगम ॥ भ्रम करि मन विफल समल ॥ वन्दे० ॥ अगतिक अम्हि तूं सकरुण । हतमति नच हो अकरुण ॥ शरण चुकवि जनन मरण । नच तुजविन कवण तरण ॥ तूंच सबल निरसनि मल ॥ वन्दे० ॥

विभुवरा नमन शत श्रीकरा । सबल क्लेशभारा । हाराया विभु० ॥ विमल शुभंकर । सकल भयंकर । दुरितभयातें वाराया ॥ विभु० ॥ प्रभुवरसंगम । अति हृदयंगम । सदुचित वाटे ताराया ॥ विभु० ॥

---

### प्रवेश १ ला

( **तपोवन** : नारदमुनी भजन करीत येतात )

**नारद** : शाबास, शाबास ! खऱ्या भक्ताचं संकट परमेश्वर निवारीलच निवारील.

**प्रभुपदीं भाव धरा अनाथनाथ तेथ खरा । मुखिं नाम घेतां गौरिवर हर साही गरा ॥ प्रल्हाद गातां दैत्यकृत अति वारी दरा ॥ बुडतां भवीं या तोचि तुजप्रति देई करा ॥ प्रभु० ॥**

राजा हरिश्चंद्रा, सध्यां तुझ्या मागं मात्र साडेसाती लागली खरी; पण त्याला मी तरी काय करणार ? आधींच कळीचा नारद म्हणून आमची ख्याती, त्यांत ही

एक नवीनच भर पडली म्हणायची! मीं आपलं सहज, हरिश्चंद्र राजाचं यशोवर्णन इंद्राच्या दरबारांत केलं. त्यासरशी वशिष्ठ व विश्वामित्र यांच्यांत वाद उपस्थित होऊन त्या शीघ्रकोपी विश्वामित्रानं हरिश्चंद्राचं सत्त्वहरण करण्याची प्रतिज्ञा केली. 'फट्ट म्हणतां ब्रह्महत्त्या' त्यांतलाच हा प्रकार. पण माझी पक्की खात्री आहे कीं, पुण्यश्लोक राजा हरिश्चंद्र विश्वामित्राच्या कसोटीला उतरून त्रिभुवनांतहि वंद्यच ठरेल.

**विश्वामित्र**—(प्रवेश करून) कोण? कोण तो धीट असं गर्वानं बोलतो आहे? अरे गर्वांधा—

**प्रति सृष्टिकर्ता विधिनियमहर्ता निजबलें॥ वसिष्ठाचे ज्यानें शत तनय रागें वधियले॥ तपानें या लोकीं अमर मुनिंना लाजवियेलें॥ हरिश्चंद्रा तो कां हत न करि सत्वीं निज छलें॥**

**नारद**—या विश्वामित्रऋषि, अजूनहि आपला कोप शांत झाला नाहीं अँ?

**विश्वा०**—तो शांत कसा होणार? या विश्वामित्राला तुम्हीं ओळखला नाहीं?

**काळाचा काळ आला जरि ममपुढती वांकवीतों तयाला॥**
**माझ्या या नेत्रतेजें दिपविन समजा खास सूर्यप्रभेला॥**
**रागाचा श्वास माझा कहर करिलची झुंजतां वायुपाशीं॥**
**तैसाची गर्जनेनें प्रलयसमयिंचा लोपवी मेघराशि॥**

त्या वसिष्ठाच्या वाक्प्रहारानं आलेला संताप कधींतरी शांत होईल काय?

**नारद**—हें पहा गाधिजमुनी, मला वाटतं इंद्रसभेंत झालेल्या गोष्टी म्हणजे एक स्वप्नच पडलं समजावं. आपण आपली प्रतिज्ञा मागं घ्यावी; वसिष्ठ ऋषी-कडून मी मागें घेववितों.

**विश्वा०**—छट्! कदाचित् ब्रह्माचा लेख टळेल, पण या विश्वामित्राचा शब्द कधींहि फिरणार नाहीं. तुम्हांला वसिष्ठाची कींव येत असल्यास, त्याला प्रतिज्ञा मागं घ्यायला सांगा. माझ्या प्रतिज्ञेपुढं त्याचं तें रडगाणं कसलं घेऊन बसलांत?

**नारद्**—तरी पण मी आठवण देतोंच. आपल्या प्रयत्नानं सत्त्वशील राजा हरिश्चंद्र जर सत्त्वभ्रष्ट न झाला, तर आपण साठ हजार वर्षें लोहपिष्ट भक्षण करून जी तपश्चर्या केली आहे तिचं पुण्य त्याला द्यावं लागेल.

**विश्वा०**—आणि हरिश्चंद्र जर सत्त्वभ्रष्ट झाला, तर वसिष्ठानं आपल्याला दासीपुत्र म्हणवून घ्यावं लागेल. काय समजलांत ?

**नारद्**—मुलांच्या भांडण्यांतल्या गट्टीतुट्टीच्या गोष्टीसारखा हा प्रकार झाला. हं सारं समजलों.

**विश्वा०**—काय ? विश्वामित्र आणि वसिष्ठ यांच्या वादविवादाला तुम्ही पोरखेळ समजतां ?

**नारद्**—तर मग काय समजूं तें तुम्हींच सांगा ? अहो गाधिजमुनी, हरिश्चंद्राला विजय मिळावा, म्हणून वसिष्ठ हिमालयावर जाऊन तप सुद्धां करीत बसले; आणि तुम्ही तर अजून बसल्या जागींच गप्पा मारतां आहां. तेव्हां हा पोरखेळ नव्हे तर काय बाहुलाबाहुलीची लढाई ?

**विश्वा०**—काय ? हरिश्चंद्राला विजय मिळावा म्हणून वसिष्ठ तप करतो ? करूं दे. मीहि अंगिकृत कार्याला लागलोंच समजा.

**योजीन युक्ति अति तीव्र हरीन सत्वा ॥**
**शासीन राय मग तो करुनी असत्वा ॥**
**गर्वांध तो मुनि करी तप त्याजसाठीं ॥**
**पर्वा न मी करितसे तिळमात्र मोठी ॥** [ जातो

**नारद्**—वाहवा ! जगद्रंगभूमीवरील हें एक अपूर्व नाटक, लौकरच लोकांना पाह्यला मिळणार आहे. असो. आपणहि त्या सूत्रधाराचं स्तवन करीत जाऊं.

**हे श्रीरंगा भवभयभंगा गंगा तूंची या मलिनांगा ॥ भजनरंगिं ही रसना रंगो ॥ मनोभृंग मम दंग असो चिर न विटो प्रभु तव संगा ॥ गायन नर्तन करुं प्रत्यंगें ॥ हरिनारायण पारायण हें चालो नित्य अभंगा ॥**

---

## प्रवेश २ रा

(**तपोवनांतील झोंपडी** : अजगरभट निजला असून, स्त्री त्यास उठवते आहे.)

**स्त्री**—अहो, उठा–उठा, असं काय करतां ? कोण मेली ही राक्षसी झोंप !

**भट**— अंः काय शिंचा त्रास आहे बुवा. मी नाहीं उठत जा.

**स्त्री**—अहो, पण बाहेर बघा–वाघ आले आहेत वाघ.

**भट**—( त्रासानं ) कशाला आले आहेत ? त्यांना म्हणावं मी घरांत नाहीं.

**स्त्री**—आतां काय करावं ? अहो, तुम्हांला जेवायला बोलवायला नाहीं आले ?

**भट**—तर मग त्यांना म्हणावं, तुम्ही नदीवर चला. दर्भसमिधा घेऊन मी पाठीमागून आलोंच.

**स्त्री**—दर्भसमिधा कशाला ?

**भट**—( त्रासानं ) तुझ्या बापाचं श्राद्ध करायचं आहे !

**स्त्री**—माझ्या बापाचं श्राद्ध मागाहून करा, पण हे तुमचे वडील बाहेर आले आहेत, त्यांच्यापुढं आधीं पिंड टाका.

**भट**—त्यांना सांग कीं, वर्षश्राद्धाला अजून अवकाश आहे; इतक्यांत तुमच्या बापाचं मी कांहीं लागत नाहीं. कंटाळा आला बुवा या वाडवडिलांचा. जिवंतपणीं तसा त्रास दिला, आता मेल्यावर असा पिच्छा पुरवताहेत.

**स्त्री**—आतां काय करूं या मुर्दाडपणाला ! तुम्ही कोणते वाघ समजलांत ?

**भट**—आपल्या शेजारीं राहतात तेच ना—बळवंतराव वाघ ?

**स्त्री**—अहो नाहीं, नाहीं. मोठे मोठे ढाणे वाघ डुरकण्या फोडीत आसपास सैरावैरा फिरताहेत.

**भट**—( घाबरून ) काय म्हणतेस ? खरोखरीचे वाघ आले आहेत ? तर मग चांडाळणी मला उठवलंस कशाला ? अरे बापरे ! अग ए, माझ्या अंगावर दोन चार मोठमोठ्या गोधड्या आणून घाल, आणि दार घट्ट लावून वाटेंत दर्भ पसरून ठेव ! [ पांघरूण घेऊन झोंपतो.

**स्त्री**—छे ग बाई ! तेवढं काम तुम्हींच करा ना ! मला भीति वाटते !

**भट**—अहाग भित्री भागुबाई ? माझ्या डोळ्यांत झोंप भरली आहे म्हणून, नाहीं तर मी दर्भ घेऊन जाईन तर मारे सगळ्या वाघांना शापून भस्म करीन.

**स्त्री**—तर मग तेवढं करावंच गडे. किती तरी लोकांचा घोळका–घाबरत, ओरडत, पडत, झडत वाघांचा नाश व्हावा म्हणून हरिश्चंद्र राजाकडे गेला आहे.

**भट**—हात्तीच्या ! मग भितेस कशाला ? राजा आला कीं, उठतों मी. मग पहा माझा पराक्रम. ते वाघ काय समजले आहेत ? हा ब्राह्मण म्हणजे–शापादपि शरादपि, हस्तादपि, लत्तादपि असा आहे हें त्यांना ठाऊक नाहीं ?

**स्त्री**—ठाऊक नाहीं म्हणूनच ते गडबड करताहेत. तेव्हां म्हणतें, त्यांना शाप द्याच. मी दार उघडतें— [ दार उघडायला जाते; तिला आडवतो.

**भट**—अँः हँ : ! दार उघडूं नकोस ग ! अग दार उघडूं नको म्हणतों ना !

**स्त्री**—पण हें काय ? असें थरथर कापतां कां ?

**भट**—मला थ–थ–थ–थंडी वाजते !

**स्त्री**—हा रांडेच्यानो ! हा तर फाल्गुन महिना ! आणि थंडी कसली ?

**भट**—तुला कळत नाहीं. यंदाचीं पंचांगं साफ चुकलीं आहेत. पंचाग लिहितांना ज्योतिषी लोकांना त–त–त–ताप भरला होता; म्हणून त्यांना उन्हाळा वाटून फाल्गुन लिहिला !

**स्त्री**—म्हणजे ? ऋतुमानावर हिंवताप असतो, कीं ज्योतिषांच्या हिंवतापावर ऋतुमान असतं ?

**भट**—कळत नाहीं म्हणतों तरी अधिक बोलते ! मारीन थोबाडींत. ज्योतिषाचं नांव तरी कधीं ऐकलं होतंस ? अग सूर्याचा सारथी लंगडा असल्यामुळं त्याचे घोडे भरधांव धांवत नाहींत, हें तुला ठाऊक तरी आहे ?

**स्त्री**—सारथी लंगडा म्हणून घोडे धांवत नाहींत, हें आजच ऐकलं मीं !

**भट**—चूप बैस, हा विषय बायकांचा नव्हे. अग, तूं आमच्या गुरुजींच्या आश्रमामधें ज्योतिष–ग्रंथाचे ढीगच्या ढीग पडले आहेत, ते कधीं पाहिले होतेस ?

**स्त्री**—ग्रंथाचे ढीग नाहीं पाहिले, पण भस्माचे ढीग पाहिले आहेत.

**भट**—हँ! इथंच तर खुबी आहे. चांगल्या पवित्र आणि विद्वान् ब्राह्मणाशिवाय ते ग्रंथ कधीं कोणाला दिसायचेच नाहींत. याला प्रमाण—जमिनींत पुरलेला द्रव्याचा हांडा सांपडला, तर त्यांत भाग्यवानाला मोहरा दिसतात; आणि अभाग्याला कोळसे दिसतात. [ वाघांची गर्जना होते.

**स्त्री**—अग बाई! वाघांचा सुळसुळाट अजून कांहीं थांबत नाहीं. त्यांना भस्म कराच. मी दार उघडतें. [ जाऊं लागते.

**भट**—(तिला अडवून)अग–अग–अग–दार नको उघडूं, दार–नको–उघडूं!

**स्त्री**—कां? घाबरगुंडी वळली वाटतं?

**भट**—अग गाढवी, म्हणजे मीं भितों अशांतला प्रकार नाहीं ग? पण आपलं तें–हँ–तें काय म्हणत होतों मी–हँ, उगीच हत्या कशाला करा! त्यांतून ब्राह्मणांनीं उगाच शाप देऊं नये, पुण्यसंचय कमी होतो. म्हणून म्हणतों कीं दार घट्ट लाव आणि तूं माझ्याजवळ बैस!

**स्त्री**—कां, माझी सोबत हवी वाटतं?

**भट**—मला कशाला सोबत हवी? मी थोडाच भित्रा आहें. पण तूं भितेस म्हणून जवळ बैस म्हणतों.

**विश्वा०**—( बाहेरून ) अहो रणशूर ब्राह्मणवीर, आधीं दार उघडा दार.

**भट**—अरे बापरे! वाघ कधींपासून बोलायला लागले! आतां ते गुरुजींना आमची चहाडीसुद्धां करायचे!

**स्त्री**—ते नकोत चहाडी करायला. बाहेर प्रत्यक्ष गुरुजचि आले आहेत.

**भट**—तर मग थांब जरा. मी धोंड–भट्टी करतों. [ भस्म लावतो.

**स्त्री**—अहो, आग लागली तुमच्या जिण्याला ती! आंघोळ केल्याशिवाय भस्म लावतां?

**भट** –चांडाळणी, गप्प बैस. आतां आंघोळ करायला अवकाश कुठं आहे? गुरुजी बाहेर येऊन उभे राहिले, आतां धोंड–भट्टीच करतों झालं. चल जा. दार उघड म्हणतों ना! भित्री कुठली! शंभरदां सांगितलं, कीं मी घरांत असतां घाबरण्याचं कारण नाहीं म्हणून. माझी स्नानसंध्या चालली होती म्हणून मी उठलों नाहीं. हँ, जा आधीं. गुरुजींला बसायला आसन आणून दे.

**विश्वा०**—अहो शापादपि ब्रह्मवीर, आसन वगैरे राहूं दे. अगोदर आपण इतका वेळ काय करीत होतां तें सांगा ?

**भट**—मी–मी–मी–कांहीं नाहीं बुवा ?

**विश्वा०**—( दरडावून ) कांहीं नाहीं ?

**भट**—'कांहीं नाहीं' म्हणजे असं, मोठ्या पहांटेस उठून हा वेळपर्यंत स्नान–संध्या देवपूजा वगैरे आह्निक उरकीत होतों.

**विश्वा०**—चूप. ब्राह्मण कुलांत जन्म घेणाऱ्या चांडाळा, मलाहि फसवूं पहातोस ? अंथरुणांतून नुकताच उठल्याची साक्ष, हा तुझा निस्तेज चेहरा देत आहे. अधमा, पारोसेपणीं लावलेलं भस्म, मढ्यावरील शृंगाराप्रमाणं या तुझ्या मळकट अंगाला शोभतं आहे. मी इंद्रसभेंत गेल्यापासून तुम्हीं आपलं नित्यकर्म असंच चालवलं आहे ना ?

**भट**—मी–मी–मी–नाहीं गुरुजी. तो शंख भट मात्र चू–चू–चू—

**विश्वा०**—चूप. सर्व प्रकार माझ्या ध्यानीं येऊन चुकला. हरिश्चंद्राच्या सत्वहरणाचं कार्य मीं जर अंगावर घेतलं नसतं, तर तुम्हांला चांगलं शासन केलं असतं.

**भट**—( स्वगत ) आतां मात्र माझ्या जिवांत जीव आला !

**विश्वा०**—हं चल आतां माझ्याबरोबर.

**भट**—( स्वगत ) पुन्हां साडेसाती फिरली. ( उघड ) कु–कु–कुणीकडे गुरुजी ?

**विश्वा०**—मी एक यज्ञ करणार आहें—

**भट**—( स्वगत ) मग, त्यांत मलाच बळी द्यायचा आहे कीं काय ?

**विश्वा०**—तेव्हां माझ्या हाताशीं चल.

**भट**—( स्वगत ) आहे–जिवाची आशा आहे ! तरी पण या वेळीं त्या ज्योतिषांच्या वांटणीचा हिंवताप मला भरेल तर बरं होईल.

**विश्वा०**—मीं काय म्हटलं तें ऐकूं आलं नाहीं वाटतं ?

**भट**—ऐकूं आलं गुरुजी. पण–बाहेर व–व–वाघ आले आहेत.

**विश्वा०**—मग भितोस कशाला ?

**भट**—मी भीत नाहीं. ही–ही आमची भिते.

**विश्वा०**—कुणालाहि भिण्याचं कारण नाहीं. ते वाघ मींच मंत्रानं मुद्दाम निर्माण केले आहेत. तुम्हांपैकीं कोणालाही ते उपद्रव करणार नाहींत. चल आतां माझ्याबरोबर. सत्त्वशील म्हणवून घेणाऱ्या राजा हरिश्चंद्रा, संभाळून ऐस.

**मीं धाडिले व्याघ्र तव प्रजेला ॥ गांजावया पाशचि जाण त्याला ॥ विध्वंसनी खेंचुनि आणतील ॥ मत्कोपवन्हीमधिं पोळतील ॥** [ जातो

**भट**—ऐकलंस, ते वाघ मंत्रानं उत्पन्न केले आहेत, हें मला ठाऊकच होतं. म्हणून तर मी डाराडुर्र घोरत पडलों होतों. अग, वाघ वाघ म्हणजे काय– आपल्या अंगणांत कुत्रीं थोडीं फिरतात? बरं जा, आणखी कालचं शिळं थालिपीठ बांधून गपचूप माझ्याजवळ आणून दे.

**स्त्री**—रांडेच्यानो! शिळं थालीपीठ कशाला?

**भट**—अग, आज एकादशी आहे. फराळ होईल. [ जातात.

---

## प्रवेश ३ रा

( **तपोवन** : हरिश्चंद्र, तारामती, रोहिदास व तपस्वी येतात. )

**तपस्वी**—हं राजा, हीं पहा तीं क्रूर श्वापदं. आतां आमचं रक्षण कर.

**हरिश्चंद्र**—अरे निर्दयांनो, माझ्या सत्त्वशील प्रजेला निष्कारण पीडा कां देतां?

**बाण टाळुनि चपलपण तें करुनि शासन चुकविलें ॥ शूर असतां दूर पळशि क्रूर मरणा मुकविलें ॥ वज्रदेही गणुनि निर्भय फिरशि आतां या वनीं ॥ राजशर हा सहन कर तव हृदय घेइल भेदुनी ॥**

**विश्वा०**—( रागानं )

**कोण तो खल दुष्ट दुर्जन अधम कपटी पातकी ॥ क्रूरकर्मी करि अधर्मा मर्मभेदक घातकी ॥ भय न धरितां संचरे वनिं काय मद्बल नेणतां ॥ धरुनि गर्वा न करि पर्वा सर्व मोडी शांतता ॥**

**हरि०**—महाराज, आम्ही त्रिवर्ग आपल्याला अभिवंदन करतों.

**विश्वा०**—अरे निर्दया, घातक्या, कपट्या—

**हरि०**—महाराज, या दीनावर कोप करण्यासारखा अपराध तरी कोणता घडला ?

**विश्वा०**—चांडाळा, पुत्रवत् मानलेल्या माझ्या प्राण्यांचा संहार करून मलाच अपराध विचारतोस ?

**हरि०**—मुनिवर्य, ते क्रूर पशू बेफाम होऊन, माझ्या प्रजाजनांना त्रास देऊं लागले, म्हणून त्यांचा वध करावा लागला.

**विश्वा०**—अरे मूर्खा, कीडेकरितां मनसोक्त संचार करणं, याला तूं अपराध म्हणशील काय ?

**हरि०**—पण ऋषिवर्य, वाघासारख्या भयंकर श्वापदांनीं लोकवस्तींत संचार करणं, म्हणजे लोकांना भय आणि चिंता उत्पन्न करून, त्यांची शांति मोडणं नव्हे काय ?

**विश्वा०**—निर्दया, त्यांच्या भक्षस्थानीं पडलेला किंवा त्यांच्याकडून दुखापत झालेला, एक तरी मनुष्य मला दाखवशील काय ?

**हरि०**—पण हिंस्रपशूंचा कुणीतरी विश्वास धरील काय ?

**विश्वा०**—वाचाळा, चांगला शोध न करतां, निरपराध्यांना शासन करणं हा राजधर्म आहे काय ?

**हरि०**—भयानं शांतताभंग झालेल्या गरीब प्रजेचं रक्षण करणं, हा राजधर्म नव्हे काय ?

**विश्वा०**—धर्माचं अवडंबर माजविणाऱ्या राजा, तुझी प्रजा जर नुसत्या भयानंच मरत होती, तर माझा शोध करून मला कळवायचं होतंस. त्यांना मीं आवरलं असतं. दुसऱ्याच्या घरांत शिरून दंडेली करणं, ही राजनीति तुझ्या त्या वसिष्ठानंच शिकविली काय ? ब्रह्मर्षि म्हणवून घेणाऱ्या वसिष्ठाची नीतिनिपुणता ती हीच काय ?

**हरि०**—महाराज, आपण त्या महात्म्याला दोष देऊं नये. प्रजा-हिततत्परते-मुळं माझ्या हातून चूक झाली असेल, तर तो अपराध माझाच होय.

**विश्वा०**—तर मग त्याचं प्रायश्चित्त तुलाच भोगावं लागलं असतं, पण—

**मूढा गर्वांध राजा परिस वचन हें मी तपोनिष्ठ आहें ॥**
**शापानें भंग आतां करित न तप तें मान आभार बा हे ॥**
**ध्यानीं राहो परंतू पुढतिं जरि घडे दोष माझा नृपाला ॥**
**क्रोधें शापीन शंका न धरि लवभरी भंगुनीयां तपाला ॥**

**तारामती**—( विश्वामित्र गेल्यावर ) महाराज, धर्म करतां कर्म ओढवतं म्हणतात, त्याचप्रमाणं हें झालं म्हणायचं !

**हरि०**—हो. असं खरंच. परमेश्वरा, जर चुकून या ऋषिवर्यांचा आमच्या हातून कांहीं अपराध घडला असेल तर क्षमा कर. सज्जन हो, क्रूर पशूंचा नाश झाल्यामुळं तुम्हीं निर्धास्त आपआपल्या घरीं जा.

**तपस्वी**—महाराज आम्हांला निर्भय केल्याबद्दल आम्हीं आपले अत्यंत आभारी आहोंत. अहाहा ! देवा या पुण्यश्लोक राजाला चिरायु कर.

**अनाथपालक दुःखनिवारक तूंच खरा नृपती ॥ तव सहवासें धन्य मेदिनी म्हणे धन्य स्वपती ॥ श्रीतारामति धन्य माउली निज-जन-वत्सल ती ॥ वीरशिरोमणि भार्या आर्या गुणवति अचल सती ॥ पितृवचनिं अति दक्ष बाल हा रोहित विमल मती ॥ चिरंजीव हो सुकीर्तिमंडित धरुनि सदा सुमती ॥ श्रीपती । भूपती । राखिल सुखी जगतीं ॥ पांचा मुखीं परमेश्वर वसतो असें संत म्हणती ॥**

[ तपस्वी जातात, हरिश्चंद्र विश्रांति घेतात; तोंच भिल्लिणी येतात.

**भिल्लिणी**—

**भ्रमरा चतुरा फुललें फुल हें । प्रियकर तुज अति चल ये मागें ॥ रसिका अशि कां भलती कृति ती । म्हणतिल अरसिक जन या त्यागें ॥ जवनें पवनें डुलतें झुलतें । सुरुचिर परिमळें मन हें रंगें ॥ रस घे रुचि घे मधुरा रुचिरा । निशिदिनिं विहरत बस या संगें ॥ उपवनभागीं । सुखमय जागीं । चिर अनुरागी । सुम उपभोगी ॥ फिरुनि फिरुनि वन । त्यजिशि स्वसुखधन । करिशि विरस मन । तुजप्रति उचित न ॥**

**हरि०**—मुलींनो, परपुरुषासमोर येऊन नृत्य-गायन करणाऱ्या अशा तुम्ही कोण आहांत ?

**१ भिल्लीण**—नृत्य-गायन करतों, यावरून आम्हीं कोण आहोंत हें का मेलं ओळखूं नये ?

**हरि०**—अस्सं ! बरं, कोणता हेतु धरून इथं आला आहांत ? माझं कांहीं साह्य पाहिजे आहे ?

**२ भिल्लीण**—हो-तसंच कांहीं-पाहिजे आहे. महाराज, आमचं दुःख दूर करावं म्हणजे झालं.

**हरि०**—तुम्हांला कोणतं दुःख आहे बरं ?

**१ भिल्लीण**—महाराज, आम्हांसारख्या सुंदर आणि तरुण स्त्रियांना दुसरं कसलं दुःख असणार ?

**हरि०**—पण तें दुःख समजलं तर पाहिजे ?

**२ भिल्लीण**—महाराज, त्या मदनाला भगवान् कैलासनाथांनीं जाळला म्हणतात; पण तें आम्हांला खोटं वाटतं.

**हरि०**—वा ! भगवंताच्या लीलेवर तुमचा अविश्वास कां बरं ?

**१ भिल्लीण**—कारण, तो मदन जर जाळला असतां, तर त्यानं आमच्या अंगाची होळी केली नसती.

**हरि०**—अस्सं अस्सं ! पण हें तुमचं विषयवासनेचं जाळं एखाद्या विषयलंपट पुरुषावर टाकलं तर नाहीं का चालणार ?

**२ भिल्लीण**—चालेलसं वाटलं, म्हणूनच इथं आम्ही चालून आलों.

**हरि०**—ठीक. तर मग आतां मीहि सांगतों कीं, जशा चालून आलांत तशा चालत्या व्हा. परस्त्रियांच्या मायापाशांत बद्ध होणारा हा हरिश्चंद्र नव्हे.

**१ भिल्लीण**—महाराज, आम्हीं परस्त्रिया नसून उपवर कुमारिका आहोंत.

**हरि०**—तर मग, तुमच्या योग्य कुमार जगांत पुष्कळ सांपडतील.

**२ भिल्लीण**—तें पहातां येईल ! पण महाराज, चालत आलेल्या लक्ष्मीचा अंगिकार न करणें हें राजे लोकांना शोभत नाहीं.

**हरि०**—देवी लक्ष्मीचा सत्कार कुणीही करील;पण मला वाटतं, तुझ्यासारख्या अवदसेकडे पाहूंसुद्धां नये.

**१ भिल्लीण**—बरं, माझं असो मेलं. मी आपली आहेच इंगाडी. पण हिला निरखून पाहिलीत का ? हें हिचं तरतरीत नाक—

**हरि०**—डाकिणी, तिचं नाक तरतरीत असेल, पण अशा निंद्य वासनेमुळें तें आहे कीं नाहीं याचीच मला शंका येते.

**२ भिल्लीण**—राहिलं; चुलींत गेलं तिचं नाक. पण हिच्यांत तर कांहीं व्यंग नाहीं ना ? हे हिचे टप्पोरे पाणीदार डोळे—

**हरि०**—अग चांडाळणी, ते पाणीदार नेत्रकटाक्ष, जहर लावलेल्या बाणाप्रमाणं, माझं हृदय विदारण करतील कीं काय असं वाटतं.

**१ भिल्लीण**—वाटो मेलं, पण हिच्या मधुर आवाजाला कोकिळाहि लाजते.

**हरि०**—असेल; पण कुलटे, या तुझ्या कोकिळेची मधुर वाणी हलाहल विषाप्रमाणं मला प्राणघातक भासते.

**२ भिल्लीण—**म्हणजे ? आम्हांला आपण कवडीमोलच का समजतां ? आम्हां सुंदर स्त्रियांचा सहवास—

**हरि०—**नको तुमचा सहवास ! परस्त्रीचा सहवास हा अति कष्टकारक आहे. अग्नीची ज्वाळा सोसवेल, कृष्णसर्पाचा दंश सोसवेल, पण परस्त्रीपासून होणाऱ्या वेदना क्षणमात्र सोसवणार नाहींत.

**१ भिल्लीण**—पण ही आमची मोहनी ढोंगाची नसून शुद्ध प्रेमाची आहे.

**हरि०**—तर मग शुद्ध प्रेम इतकं सवंग असतं अं ! परिचय नसतां ज्या तुम्ही एकदम माझ्यावर शुद्ध प्रेम करूं लागलां, त्या तुम्ही दुसरा सुंदर पुरुष पाहून स्वस्थ बसाल काय ?

**२ भिल्लीण**—नाहीं महाराज, तसं होणार नाहीं. पाहिजे तर आम्हीं आपल्या गळ्याची शपथ घेतों.

**हरि०**—नको. ती गळ्याची शपथ नव्हे, तर प्रत्यक्ष गळफांसच होय.

**१ भिल्लीण**—महाराज, अशा रीतीनं बोलणं म्हणजे आमच्या सौंदर्याची विटंबनाच नव्हे काय ? हें आमचं सौंदर्य पाहून—

**हरि०**—बायांनो, आईचं सौंदर्य मुलगा कधींच पहात नसतो. तुम्हांला मी निक्षून सांगतों कीं, तारामतीशिवाय इतर सर्व स्त्रियांना मी मातेसमान समजतों. मातोश्री, या आतां, व्यर्थ श्रम घेऊं नका.

**भिल्लिणी**—हाय–हाय ! जळो आमचं जिणं ! महाराज, आम्हींच आपल्याला व्यर्थ श्रम दिले. आम्हांला क्षमा करा–क्षमा करा—

**नृपसंता मतिमंता वाटत लाज आज गुणवंता॥ अंत न तुझिया सुगुणा दांत खरा भाससि जगिं शांता॥ कुमतिस भंजन अंजन तूं असती स्मरवंता॥ भ्रांत स्त्रीनागिर्णींचे दंत तुवां पाडुनि शांतविल्या॥ देउनि दूषण भूषण त्या दिधलें या स्वांतां॥ किंतु न लव मनिं धरितां मंतु घडे वाटे खंति अतां॥ विनवित नमवित शिरगत दोष त्यजीं हरि चिंता॥** [ हरिश्चंद्र जातो.

**विश्वा०**—( प्रवेश करून ) कसं काय पोरींनो, साधली का शिकार ?

**१ भिल्लीण**—महाराज, आपण सर्व जाणतांच; मग आमच्याच तोंडून आमचाच फजितवाडा ऐकण्यांत काय बरं अर्थ आहे.

**विश्वा०**—काय ? फजितवाडा ? आणि तो तुमच्यासारख्या सौंदर्यानं मुसमुसलेल्या, विलासांत कसलेल्या, अशा स्त्रियांचा फजितवाडा–सुखविलास भोगणाऱ्या राजाकडून व्हावा ?

**भिल्लीण**— महाराज, तो राजा कसला ? राजर्षीच तो ! त्याला भुलवायचं अप्सरांच्यानंहि व्हायचं नाहीं.

**विश्वा०**—धिःकार असो तुम्हांला ! सटव्यांनो, मग हा स्त्रियांचा जन्म तरी कशाला घेतलांत ? मुरकून मुरकून, गाऊन गाऊन, नाचनाचून, डोळे मारमारून, सटव्यांनीं बक्षिस काय मिळवलं ? तर पालथे पायपोस !

**१ भिल्लीण**—पण त्याला आम्हीं तरी काय करावं ?

**विश्वा०**—आतां तेच फाटके पायपोस चघळीत बसावं ? टवळ्यांनो, ऐष-आराम भोगणारा राजा तुम्हांला वळवतां येऊं नये, मग तुम्हीं कुत्रीं, मांजरं भुलविणार होय ?

**२ भिल्लीण**—छेः छेः ! तसेच जे कोणी लोचट तपस्वी असतील, त्यांना भुलवून त्यांचीं कुत्रीं करून पाठीमागून फिरवूं.

**विश्वा०**—( स्वगत ) अरेच्या ! या चांडाळणीनं माझंच बिंग बाहेर काढलं ! मेनकेच्या नादानं मी एकदां कुत्रा बनलों होतों खरा ! ( उघड ) निघा इथून सटव्यांनो ! उखाळ्या पाखाळ्या काढून माझ्या आंगाची आग नका करूं.

**१ भिल्लीण**—मिरची झोंबल्यावर आग व्हायचीच.

**विश्वा०**—अरेच्या ! चालत्या व्हा म्हणतों ना ! खबरदार आपलीं काळीं तोंडं पुन्हां मला दाखवाल तर.

**२ भिल्लीण**—भिल्लीणींचीं तोंडं काळीं असलीं, तर त्यांत कांहीं मोठंसं नवल नाहीं, पण आपलं उजळ तोंड पुढं काळं होईल, याचा विचार केला का ?

**१ भिल्लीण**—भिल्लीणी नकट्या असल्या तरी त्यांना कुणी हंसणार नाहीं. पण पुढं तुमचं नाक कापलं जाईल याचा विचार केला का ?

**२ भिल्लीण**—भिल्लीणींना राजा वळला नाहीं, तरी त्याची त्यांना लाज नाहीं. पण पुढें तोंच राजा तुमचा कान धरून वळवील, याचा विचार केला का ?

**विश्वा०**—अरेच्या ! अवाक्षर बोलूं नको म्हणतों ना ! व्हा चालत्या इथून, कुलटांनो. तुम्हांला मीं मुद्दाम निर्माण केलं कशाला ?

**१ भिल्लीण**—पापकर्म वाढवायला !

**विश्वा०**—हो-हो-पापकर्म वाढवायला! माझा हेतु तुम्हांला तडीस नेतां येऊं नये ? धिःकार असो तुम्हांला !

**२ भिल्लीण**—मुलींना जन्म देऊन, त्यांना बदकर्म करायला शिकविणाऱ्या तुमच्यासारख्या बापांनाहि धिःकार धिःकार असो तर मग !

**१ भिल्लीण**—चला ग. या दगडाशीं बोलून फायदा कोणता ?

**नाहीं माया। ढोंग्याला कांहीं गे या। नको गे गडे भ्याया ॥ नच साधू हा भोंदू संबोधूं ॥ या निंदू गुणसिंधू नृप वंदूं ॥ ऐशा त्या गुणिराया। हा गांजी मुनी वायां ॥ अवगुणि या। भ्रमवाया। उँरि माया। धरि वायां ॥ देव सदा राखो सुखी थोर नृपाला गे ॥ अपयशि हो हा मुनिराय। या होउ अपाय। ना होई सहाय ॥ हे प्रभुराया नमितों पाय; हृदयिं न हाय; दुःख समाय ॥**

---

## प्रवेश ४ था

( **अरण्य** : तारामती, रोहिदासासह हरिश्चंद्र झोपेंत बडबडत येतो. )

**तारा०**—हें काय? बडबड करीत, झोपेंतच कुठं जायचं?

**हरि०**—थांब ग. मीं ज्या ब्राह्मणाला स्वप्नांत राज्यदान दिलं त्या ब्राह्मणाला शोधतों आहें.

**विश्वा०**—( प्रवेश करून ) तुला श्रम नकोत. हा मी तुझ्या पुढेंच उभा आहें. सोड पाणी. ( हरिश्चंद्र पाणी सोडतो. ) राजा, राज्यदान दिल्याबद्दल तूं वाचादत्त तर झालासच,—

**हरि०**—महाराज, वाचादत्तच कां?—राज्यदानाचं उदक सोडून, मोकळा झालों. आतां अयोध्येंत चलावं, म्हणजे शिक्कामोर्तब स्वाधीन करतों.

**विश्वा०**—ठीक आहे. चल अयोध्येंत. पण तूर्त ही राजमुद्रा माझ्या स्वाधीन करीनास. ( राजा मुद्रिका देतो. ) ठीक. तूं अयोध्येंत चल. मी तुला तिथं भेटेन. [ जातो.

**तारा०**—महाराज, हें आपण काय केलं?

**हरि०**—सूर्यकुलांतील पुरुषांना योग्य, तेंच मीं केलं.

**तारा०**—पण पुढं आपलं व्हावं कसं?

**हरि०**—कुलदेवतांच्या मनांत असेल तसं! तारामती, राज्यलोभाकरितां कां तूं धर्मपत्नी झाली आहेस?

**तारा०**—महाराज, निदान आपण तरी असं बोलूं नये. इतक्या दिवसांच्या सहवासांत, या तारामतीचं मनोगत खरंच का अजून आपल्याला कळलं नाहीं? महाराज, ही तारामती आपल्या प्रेमाला आणि सद्‌गुणाला जितका मान देईल, तितका वैभवाला किंवा सुखाला देणार नाहीं.

**हरि०**—तर मग, शिरावरचा राज्यकारभार उतरल्याबद्दल आनंद मान.

---

## प्रवेश ५ वा

( **दरबार** : प्रधानादिक बसले असतां विश्वामित्र येतो. )

**विश्वा०**—कुठें आहे–कुठें आहे तो वचनभंग करणारा राजा ?

**प्रधान**—अहो भटजी महाराज, आपण रस्ता तर नाहीं ना चुकलांत ? कारण, वचनभंग करणारा राजा या अयोध्येंत नाहीं, हें सर्व जग जाणतं आहे. दुसऱ्या एखाद्या देशांत पहा.

**विश्वा०**—तर काय राजा हरिश्चंद्राचा हा दरबार नव्हे ? एकूण त्यानं मला ब्राह्मणाला फसवलं म्हणायचं !

**प्रधान**—असं कधींच व्हायचं नाहीं. चंद्राच्या स्वच्छ आणि शीतल प्रकाशांत कधींच कोणी फसणार नाहीं. आपल्याला काय हवें आहे तें आम्हांला सांगा. महाराज जरी इथं नसले, तरी आपली इच्छा आम्ही पूर्ण करतों.

**विश्वा०**—अहो दानशूर, तुमचें औदार्य आम्हांला नको आहे. तो वचनभ्रष्ट राजा कुठं आहे ? [ हरिश्चंद्र, तारामती, रोहिदास येतात.

**हरि०**—हा मी आपल्या सेवेंत तत्पर आहे.

**विश्वा०**—ठीक आहे. तर मग टाक दक्षणा. तुझ्या म्हणण्याप्रमाणं मी इथं आलों. आतां उशीर कां ?

**हरि०**—महाराज, या सिंहासनावर बसावं; माझ्याकडून पूजा ग्रहण करावी, आणि आपली दक्षिणाहि घ्यावी. प्रधानजी, पूजेचें साहित्य आणा.

**विश्वा०**—अरे जळलं तुझं साहित्य. पूजा आरती करून घेऊन धुपाटणं हातीं घेण्याकरितां मी इथं आलों नाहीं. दक्षणा अगोदर टाक, राजा—

**राज्याचें मजला प्रदान करुनी देशी न कां दक्षणा ॥**
**सत्याचें तव सोंग ढोंग बघुनी मोहीं न मी या क्षणा ॥**

**हरि०—देतों जें वदलों तुम्हां द्विजवरा चिंता नको अल्प ती ॥**

**विश्वा०—दे दे आधिं—**

**हरि०—परंतु—**

**विश्वा०—शब्द न वदे—**

**हरि०**—हें काय—

**विश्वा०**—रे दुर्मती ॥

**हरि०**—महाराज, आपण कोप करूं नये, शांत व्हा. अहो कोशाधिपति, भांडारखान्यांतून ओटभर सुवर्ण घेऊन या.

**विश्वा०**—अहो शहाणे गृहस्थ, जरा उभे रहा. माझ्या आज्ञेशिवाय इथून हलतां उपयोगी नाहीं. राजा, तूं काय माझी थट्टा मांडली आहेस? अरे, ज्या अर्थी राज्य माझं, त्या अर्थी सर्व नोकर, चाकर आणि भांडारखाना माझाच नव्हे काय? असं असतां माझ्याच नोकराकडून, माझंच द्रव्य, मलाच आणून देतोस? राजा, तुला दक्षणा देववत नसेल तर साफ नाहीं म्हणून सांग आणि वचनभ्रष्ट हो.

**तारा०**—द्विजराज, आपण नसता दोष आम्हांला लावूं नका. सूर्यकुलांतील एखादी स्त्री मतिभ्रष्ट, शास्त्रभ्रष्ट, कर्मभ्रष्ट किंवा वचनभ्रष्ट मिळायची नाहीं. मग राजपुरुष–राजशासनकर्ता, वचनभ्रष्ट कसा बरं मिळेल!

**रोहि०**—नाहींच मिळायचा. सूर्यवंशांतील स्त्री–पुरुष तर काय, पण त्यांचा बच्चा सुद्धां वचनापासून भ्रष्ट होणार नाहीं.

**विश्वा०**—थांब रे कार्ट्या! तुमच्या सूर्यवंशाचे स्तुतिपाठ ऐकायला मी इथं आलों नाहीं. माझी दक्षणा मला द्या; नाहीं तर दक्षणा देण्याची ऐपत नाहीं असं म्हणून वचनभ्रष्ट व्हा.

**तारा०**—महाराज जरा थांबा; आपल्या दक्षणेकरतां, मी आपले सर्व अलंकार आणून देत्यें.

**विश्वा०**—तारामती, थांब, थांब. चाललीस कुठं? ज्या अर्थी तूं हरिश्चंद्राची अर्धांगी, सुख–दुःखाची सहचारी, पाप–पुण्याची वांटेकरीण, त्या अर्थी तुझ्या अलंकारावर हरिश्चंद्राची सत्ता नाहीं काय?

**तारा०**—अलंकारच काय, पण या देहावर देखील त्यांचीच सत्ता आहे.

**विश्वा०**—असं खरं ना? मग दक्षणेप्रीत्यर्थ अलंकार आणून देतांना तुला लज्जा कशी वाटत नाहीं? मला फसवूं पहातेस काय? वाहवा रे सति तारामती!

**तारा०**—आम्ही बायका अल्पमति, गैरसमजुतीनं माझ्या हातून दोष घडत होता. पण आपल्यासारख्या दयाळु महात्म्यानंच त्याचं निवारण केलं. आपल्यासारखे थोर दयाळु—

**विश्वा०**—मसणांत गेले ते दयाळु! माझी दक्षणा अगोदर आणा.

**रोहि०**—तर मग द्विजवर्य, हे माझे अलंकार घ्या, आणि माझ्या वडलांना ऋणमुक्त करा.

**विश्वा०**—कारट्या, चल हो बाजूला. ओंठ पिळला तर दूध निघेल, आणि गोष्टी सांगतो आहे आजोबाच्या! मूर्खा, हे अलंकार तूं कुठून आणलेस!

**रोहि०**—हे माझ्या आई-बापांनींच माझ्या आंगावर घातले आहेत.

**विश्वा०**—झालं तर. त्या अलंकारांवर तुझी मुळींच सत्ता नाहीं. वात्रटाप्रमाणं उगाच बडबड करूं नकोस.

**रोहि०**—तर मग, मी आपला देह गहाण ठेवून आपली दक्षणा फेडतों.

**विश्वा०**—गप्प बैस बढाईखोर कार्ट्या! पित्याच्या आज्ञेशिवाय तुला कांहीं-एक करतां येणार नाहीं.

**रोहि०**—हर हर! तर मग तातमहाराजांना ऋणमुक्त व्हायला, दुसरा कांहींच उपाय नाहीं काय?

**विश्वा०**—आहे. दक्षणा देण्याचं वचन मीं दिलं नाहीं असं राजानं म्हणावं.

**रोहि०**—आणि आम्हीं सर्वांनीं अधोगतीला जावं! छे: छे:! प्राण जावो अथवा राहो, पण असे शब्द आम्हीं कुणीच बोलणार नाहीं.

**एक वेळ दिधलें तें वचन मोडुं का ॥ वचनभ्रष्ट हेंच नांव**
**जगतिं जोडुं का ॥ दीन होय म्हणुनि आज धर्म सोडुं का ॥**
**थोर पूज्य मातृपितृकीर्ति खोडुं का ॥ निष्कलंक सुयशतरू**
**मीच तोडुं का ॥ पुण्यवान् पूर्वजांस नरकिं ओढुं का ॥**

**विश्वा०**—तर मग आमची संभावना मुष्टिमोदक चारून करावी, हा एक दुसरा सोपा मार्ग आहे.

**रोहि०**—शिव शिव! सूर्यकुलांतील क्षत्रियांच्या मनांत अशी कल्पनाहि यायची नाहीं.

**प्रधान**—अहो द्विजवर्य, तर मग मी आपली संपत्ति दक्षणेप्रीत्यर्थ देतों.

**विश्वा०**—अहो भले गृहस्थ, आपण कोण आहांत?

**प्रधान**—मी महाराजांचा दिवाण आहें.

**विश्वा०**—तर मग अहो दिवाणे, ती संपत्ति या राज्यामधलीच आहे, आणि तुम्हीहि माझेच आज्ञांकित आहांत; तेव्हां पुन्हां असे मधें लुडबडूं नका.

राजा, हे पोरखेळ बंद करून, मुकाट्यानं माझी दक्षणा देणार—का मला इथं उपाशीं मारणार?

**हरि०**—महाराज, नवखंडपृथ्वीचं राज्य मीं आपल्याला दान दिलंच आहे. पण दहावं खंड जें श्रीक्षेत्र काशी, तें भगवान श्रीकाशी-विश्वेश्वराचं स्थान आहे; त्याच्यावर आपली सत्ता पोंहचत नाहीं, तर कृपा करून काशीक्षेत्रीं चलावं.

**विश्वा०**—आणि तिथं जाऊन तडफडून मरावं!

**हरि०**—महाराज, असं म्हणूं नका. मी आपल्या देहाचा विक्रय करून तिथं आपली दक्षिणा फेडीन, पण ब्रह्मऋणांत कधींहि राहणार नाहीं.

**विश्वा०**—बरं आहे. चल काशीला. तूं हो पुढं, मी तिथं तुला भेटेन. पण हो-थांबा, थांबा—हे अंगावरचे कपडे आणि दागिने काढून ठेवा. त्यांच्यावरहि माझीच सत्ता आहे. [ शिष्यास ] दे रे तुझे कपडे या राजाला, तुझ्या स्त्रीचे तारामतीला आणि तुझ्या कारट्याचे या पोराला दे.

**भट**—आणि मी काय करूं गुरुजी?

**विश्वा०**—अरे, मी काशीला जाऊन येईपर्यंत हें राज्य तूं सांभाळ?

**भट**—खरं कीं काय? अरे वा! ही आळशावर गंगाच आली म्हणायची! आमची बायको आम्हांला रोज म्हणत असते कीं, तुम्हीं असेच-तुम्हीं तसेच-तुम्हांला अक्कल नाहीं, तुम्हांला हें नाहीं नि तें नाहीं. पण आतां एकाएकीं मिळालेल्या राजेपणानं आमच्या कर्कशा राणीसाहेबांना चकित करून सोडतों.

[ सर्व जातात.

**विश्वा०**—आपणहि आतां दुसरा एखादा शिष्य बरोबर घेऊन काशीक्षेत्रीं जावं. पण छे:, राजा काशीला पोंचेपर्यंत मार्गांत अनेक अडथळे आणलेच पाहिजेत. तोंपर्यंत सर्व स्थिरचरभूतमात्रांना मी आपल्याच धोरणानं वागवणार. पाहूं या राजा सत्त्वाला कितपत टिकतो तो!

**सूर्या आज्ञा तुला ही प्रखर तव करें तापवी पृथ्वि सारी ॥**
**राजा-राणी-कुमारा सुख न तिळ मिळो ताप दे त्यांस भारी ॥**
**हे अग्ने, वाणि ऐके भडकुनि विघडी राय-कांता-कुमारा ॥**
**रे मेघा पाणि ने दे खळखळ रडुं दे होउं द्या कोंडमारा ॥**

---

## प्रवेश ४ था

( **झोंपडी** : अजगरभटाचें बायकोशीं भांडण. )

**भट**—चल निघ, बोलूं नकोस माझ्याशीं. असली खट्याळ बायको मला नको आहे. ही का शिंची बायको ? अहो, हा सगळ्या बायकांचा उतारा–आणि म्हणून तर आमच्या संसाराचा बोजवारा.

**स्त्री**—अहाहा ! उजेड ! असा नवरा शहाणा, ओ म्हणतां ठो कळेना नि बायकोच्या डोळ्याचं पाणी खळेना !

**भट**—पहा बरं, मला आतां अधिक राग येऊं लागला आहे. मी एकदां पुरा रागावलों म्हणजे मला कसलंच भान राहणार नाहीं. घरांत आहे नाहीं त्याचा पार फडशा उडवून टाकीन.

**स्त्री**—सरदार बहादूर तिरशिंगरावच कीं नाहीं ? येऊन जाऊन काय तीं चार मडकीं आहेत; तीं फोडायला कांहीं घोड्यावर बसून यायला नको. एखादं रांगतं शेंबडं पोर देखील तें काम करील.

**भट**—अरेच्या ! आतां जर मला आणखी राग आणशील तर–तर–तर—

**स्त्री**—तर काय ?

**भट**—येऊं घातलेल्या राजलक्ष्मीला लाथ मारून संन्याशाचं सोंग घेईन.

**स्त्री**—पण राजलक्ष्मी तुमच्याकडे यायला ती खुळीच असेल ?

**भट**— म्हणजे, तूं मला अगदीं मूर्खच समजतेस कीं काय ?

**स्त्री**—नाहीं तर काय ? हें रूप, ही विद्वत्ता पाघळणारे हे गुण पाहून राजलक्ष्मी तर भाळणार नाहींच, पण एखादी अवदसा मात्र भाळेल खरी.

**भट**—तर मग खरोखरच माझ्या गळ्यांत ही अवदसा पडली आहे.

**स्त्री**—हं ! मला अवदसा म्हणतां वाटतं ? अक्कल फार लांबत चालली बरं. खेटरसुद्धां पडेना गळीं म्हणून तर माझा घेतलात बळी.

**भट**—म्हणूनच तुझी योग्यता खेटरापेक्षां कमी. पण आतां बघ, राजा झाल्यावर कशी फक्कड बायको करणार आहें—

**स्त्री**—दिवे ओवाळा दिवे ! अक्कल भीकमाग्याची नि नक्कल केली राजाची.

**भट**—अग नक्कल कां ? अस्सल राजा बनतों पहा.

**स्त्री**—हो! तुमच्यासारख्या खादाडाला राज्य मिळालं, म्हणजे त्याचं वाटोळं व्हायला कांहीं उशीर नाहीं.

**भट**—शहाणीच आहेस. अग, गुरुजी मला जे नेहमीं खादाड महाराज म्हणतात, त्याचा अर्थ तर तुला ठाऊक आहे?

**स्त्री**—हो. फक्त खातांना म्हशीचा कडबाच तेवढा नको म्हणतां.

**भट**—याचं कारण, तो कडबा तुझ्यासारख्या म्हशीला पुरला पाहिजे.

**स्त्री**—मला म्हैस म्हणतां वाटतं? तर मग अहो माझे प्राणनाथ—

**भट**—काय? मी म्हशीचा प्राणनाथ! पण जाऊं दे; तुझ्याशीं हुज्जत घालीत बसायला मला वेळ नाहीं. मला आतां राजा व्हायला जायचं आहे.

**स्त्री**—तरीच घरांत आल्यापासून डौल चढला आहे. बरं, पण कोणत्या गाढवाचं राज्य आपल्यासाठीं तप करीत बसलं आहे?

**भट**—म्हणजे? मी गाढव आहें वाटतं?

**स्त्री**—तें मी कशाला बोलूं?

**भट**—म्हणूनच मी तुला गधडी म्हणतों. अग शहाणे, अयोध्येचं राज्य मला मिळणार आहे-अयोध्येचं!

**स्त्री**—होय का? आपल्याइतका उंटावरचा शहाणा साऱ्या अयोध्येंत कोणी नाहीं वाटतं?

**भट**—दीड शहाणीच तूं. अग, विश्वामित्र गुरुजींनीं तें राज्य हरिश्चंद्रापासून दान घेतलं आहे; आणि मला म्हणाले, हें राज्य तूं सांभाळ.

**स्त्री**—पुरे पुरे. आपल्या ताब्यांत हरिश्चंद्राचं राज्य द्यायला गुरुजींना वेडच लागलं असेल?

**भट**—त्यांना नाहीं, पण तूं मात्र पागल झाली आहेस. अग, त्यांना जर राज्य हवं असतं, तर त्यांनीं आपलं कान्यकुब्ज देशाचं राज्य कां सोडलं असतं? शहाणी म्हणावी तर समजत नाहीं; आणि गधडी म्हणावी तर ऐकत नाहीं.

**अगदिंच खट्याळ तूं न शंका ॥**

**स्त्री—उजेड तुमचा वाजत डंका ॥**

**भट—थूः थूः कुणि तरि हिजवरती थुंका ॥**

स्त्री—भीत न मी निःशंका ॥ कितीही भुंका ॥
स्त्री—लोक बोलती खविस जसे का ॥
भट—कोण हडळ हें दिसतें लोकां ॥
स्त्री—मी नच, ओरडतां कां ॥
भट—तर मग तुझाच काका ॥
स्त्री—खुशाल मारा हांका ॥
स्त्री—या हो कुणि तरी यांना हांका ॥
भट—जखिणीला या धरुनी ठोका ॥
स्त्री—भीत न असल्या धाका ॥
भट—स्त्री नच जणुं ही लंका ॥
स्त्री—म्हणूनि वरिलें रंका ॥

---

## प्रवेश ७ वा

### ( रस्ता )

नागरिक—

हाय ! हाय ! हाय ! बा जगदीशा । दुरितविनाशा । नृपमणिनाशा । दिधली कुदशा । नेशि विदेशा ॥ हाय० ॥ दीनानाथ दीन अनाथ । करुनि सनाथ । सुखवी तात ॥ सागर तूं करुणेचा असशी । दीनावरती कां मग रुससी । अंतिं परिस तरि विनती तुजशीं । सुखी करी या प्रिय नृपतीशीं ॥ हाय० ॥

[ हरिश्चंद्र, तारामती, रोहिदास दीन वेषानें वनवासाला निघतात.

हरि०—

वनवास व्हाया सुखाचा । मनिं छंद धरि रे हरीचा ॥ सौख्या कारण जरि राज्यें तीं । चिंता भीती हृदयीं देतीं । मन घेत नित ध्यास रिपुचा ॥ मनिं छंद० ॥ आत्म्यातें सुख नच राज्यानें । निःसंशय ये सत्याचरणें ॥ त्यजिं मोह भ्रम तोड मतिचा ॥ मनिं छंद० ॥ सानापासुनि करी थोरातें । तो जगदीश्वर एकया हातें ॥ अभिमान मग सोड मनींचा ॥ मनिं छंद० ॥

सज्जन हो, आमचा मार्ग रोखून आपण कां बरं उभे आहांत ? आणि आपण सर्वजण दुःखीकष्टी कां ?

**नागरिक**—महाराज, वृक्ष पाषाणहि दुःखी झाले आहेत; मग आम्ही तर काय मनुष्यच आहोंत. पण, आपण हें काय आरंभलं आहे ?

**हरि०**—सूर्यवंशांतील पुरुषांना शोभेल असंच मीं वर्तन केलं आहे. राज्य-दानाचं पुण्य संपादल्यामुळं मी तर आपल्याला भाग्यवानच समजतों.

**विश्वा०**—( रागानं येतो ) काय ? अजून तुम्ही इथंच ? मला वाटलं तुम्ही दहावीस कोस तरी गेलां असाल ? राजा, हे लोक जमवून कसलं खलबत चालवलं आहेस ? समजलों; यांना चिथावून देऊन बंड करण्याचा विचार आहे वाटतं ?

**हरि०**—नाहीं महाराज, सूर्यवंशांतील राजपुरुष बंडखोर नसून बंडखोरांना दंड करणारे असतात.

**विश्वा०**—तर मग सर्वांना बरोबर नेऊन मला ओसाड गांवचा राजा करण्याचा तुझा विचार दिसतो ?

**हरि०**—शिव शिव ! असलं निंद्य आचरण करून मी आपल्या औदार्य-शाली कुलाला कधींहि कलंक लावणार नाहीं.

**विश्वा०**—तर मग माझ्या प्रजेजवळ भीक मागून माझी दक्षणा फेडायचा तुझा बेत आहे वाटतं ?

**हरि०**—नाहीं महाराज, मी प्रजाजनांचा शेवटचा निरोप घेत होतों.

**विश्वा०**—आतां तुझा आणि त्यांचा संबंध काय ?

**हरि०**—कांहीं नाहीं. पण आजपर्यंत लोभ होता—

**विश्वा०**—अरे ढोंग्या ! लोभाचं निमित्त दाखवून माझ्या विरुद्ध त्यांना कांहीं तरी शिकवीत होतास ? अहो दानशूर, आम्हांला तसलं कांहीं नको. तुम्हीं आतांच्या आतां चालू लागा कसे.

**हरि०**—जातों महाराज. सज्जन हो, जा आपआपल्या घरोघर. आपला ऋणानुबंध संपला यापुढं. तारामती, वत्सा, चालू लागा.

**विश्वा०**—अरे पण थांबा, थांबा. तारामती, तें तुझ्या गळयांत काय चमकतं आहे ?

**तारा०**—तें मंगळसूत्र आहे महाराज.

**विश्वा०**—तें मलाहि दिसतं आहे; पण तें घेऊन कुठं चाललीस ? ठेव काढून अगोदर.

**तारा०**—महाराज, तो आम्हां बायकांचा सौभाग्यालंकार, काढून ठेवतां येणार नाहीं.

**विश्वा०**—बरं. मर जा तेवढा घेऊन. अरे, पण हा गलबला कशाचा !

[ कांहीं नागरिक अजगर भटाला बांधून आणतात.

**भट**—गुरुजी–गुरुजी, आधीं माझा प्राण वांचवा हो ! मी बहुतेक मेलोंच आहें, मात्र आतां भूत व्हायचा राहिलों आहें.

**हरि०**–अरे–अरे ! त्या गरीब ब्राह्मणाचे असे काय तुम्हीं हाल मांडले आहेत ? सोडा त्याला. [ स्वतः सोडवतो.

**भट**—सुटलों एकदांचा ! गुलामांनो, आतां सुटलों नसतों तर कांहीं वेळानं मरून मी ब्रह्मराक्षस झालों असतों. आणि तुम्हां सर्वांच्या बोकांडीं बसलों असतों.

**विश्वा०**—हरिश्चंद्रा, याचा अर्थ काय ? माझ्या राज्यांत, माझ्या आवडत्या शिष्याचा,–इथल्या भावी राजाचा,–त्याच्याच प्रजेकडून अपमान ?

**हरि०**—महाराज, हें कसं काय झालं तें मलाहि ठाऊक नाहीं. पाहिजे तर आपण समक्षच याची चौकशी करावी. काय झालं रे बाबांनो ?

**भट**—ते गुलाम काय सांगणार आहेत ! कांहीं तरी खोटंनाटं बनवून सांगतील बेटे. हं. चूप. ए हलवाया, खबरदार बोललास तर. सहा महिने फांशी देईन गुलामा. गुरुजी, मीच सारं सांगतों.

**विश्वा०**—बरं, तूंच सांग.

**भट**—म्हणजे असं झालं गुरुजी, मी आमच्या हिला घेऊन, तुमच्या मागोमाग इकडे येत होतों.

**विश्वा०**—मग ती तुझी बायको कुठें आहे ?

**भट**—तिला ह्या हलवायाकडे ठेवली आहे.

**विश्वा०**—गहाण ठेवलीस कीं काय ?

**भट**—कायमची नव्हे, पण उगाच थोड्या वेळापुरती ठेवून दिली आहे.

**विश्वा०**—मूर्खा, तुला कांहीं अक्कल ?

**भट**—पण पुढील तर ऐका नक्कल.

**नागरिक**—( स्वगत ) आमचे राजे होणार ते हेच का बेअक्कल !

**भट**—तेव्हां काय झालं ?; पायीं रखडत रखडत एकदांचा एका हलवायाच्या दुकानाजवळ आलों. पुढं अशी मौज झाली कीं, त्या हलवायाच्या दुकानांतून पक्कान्नांचा घमघमाट येऊन, या माझ्या नाकांत शिरला. झालं, लहान पोरं जशीं नाकांतला शेंबूड गिळतात, त्याप्रमाणं मीं तो वास गिळला आणि दुकानांत घुसून आम्हीं दोघांनीं मारे हाता-तोंडाशीं गांठ घालून बर्फी, पेढे, लाडू, जिलब्या यांची ताटं, पुन्हां भरून ठेवण्याकरितां रिकामीं करून ठेवलीं.

**विश्वा०**—आणखी इतकं होईपर्यंत तो हलवाई काय मेला होता ?

**भट**—सगळेच हलवाई मेले असते तर आम्हीं सावकाश तरी खाल्लं असतं; पण तो लबाड होता आंत. आम्ही आतां हलव्याच्या ताटाला हात घालणार, तोंच तो हलवाई आपलं दोंद हलवीत तिथं आला आणि माव्याच्या ऐवजीं बेटा आम्हांला मारच देऊं लागला. मी ओरडत होतों, माझी बायको कोकलत होती कीं-अरे गधड्या, आम्हांला मारूं नकोस, आम्ही राजा-राणी आहोंत.

**विश्वा०**—तरीच त्यानं तुम्हांला ही मेजवानी दिली बरं का ?

**भट**—त्याचं कांहीं नाहीं गुरुजी. पण आम्हीं पेढे-बर्फी ज्यास्त न खातां मार मात्र पोटभर खाल्ला. मग मात्र मला आला संताप. मी रागारागानंच म्हणालों कीं, 'लुच्चा, एवढी भिजास कशाला करतोस ? तुझ्या पैशाकरतां घटकाभर माझी बायको ठेवून घे. राजवाड्यांत जाऊन मी आतां पैसे पाठवून देतों.'

**विश्वा०**—आहेस, औदार्यशाली आहेस खरा. बरं, पुढं ?

**भट**—पुढं काय ? त्यांनीं आणलंच तुमच्यापुढं आमचं मढं ! उनाड मुलाची उचल बांगडी करून, ज्याप्रमाणं त्याला शाळेंत नेतात त्याप्रमाणं यांनीं माझी उचलबांगडी करून, गुरुजी, तुमच्यापुढं मला आणलं.

**विश्वा०**—एकूण आपण बाळपणाचे संस्कार पुन्हां भोगले म्हणायचे ?

**भट**—पण गुरुजी, आतां मला घोडीवर मात्र चढवूं नका. हो बरी आठवण झाली. गुरुजी, या हलवायावर माझी फिर्याद आहे. याची मेवामिठाई आम्हीं दोघांनीं खाल्ली असतां. त्यानं माझी एकट्याचीच उचलबांगडी कां केली? माझ्या बायकोची उचलबांगडी कां केली नाहीं ?

**विश्वा०**—होईल, तिचीहि होईल. राजा, पाहिलंस ना हें. तुझ्यासमक्ष या लोकांनीं कशी चेष्टा मांडली आहे? मग पुढं कसं होणार? अहो दानशूर महाराज, हें कुंथत दान आम्हांला नको आहे.

**भट**—अहो गुरुजी, ब्राह्मणाच्या कपाळीं दान म्हणजे–नासकी सुपारी, कुजला नारळ, फुटकं भांडं, मोडका पलंग, आणि मरतुकडी नाहीं तर वांझ गाय!

**विश्वा०**—खरंच तें. अहो पातळयंत्री महाराज, घ्या हें आपलं राज्य परत. हा मी चाललों.

**भट**—अहो, हें काय गुरुजी ? राज्य मला दिलं आहे ना ? आणि आतां परत देतां ? हें चांगलं तुमचं दुटप्पी बोलणं. अहो, मी राजा झाल्याबद्दल माझ्या बायकोला नि इष्टमित्रांना बातमी देखील कळवून आलों. आणि आतां ते मला खेटराजवळ तरी उभे करतील का? वाः गुरुजी!

**विश्वा०**—अरे पण नाखुषीचं रडत राज्यदान तुलाहि नको, नि मलाहि नको. चल परत. [ जाऊं लागतो.

**हरि०**—थांबा महाराज, रागानं जाऊं नका. सज्जन हो, ऐकलंत ना द्विजवर्यांचं मर्मभेदक भाषण ? तुमच्या या वागणुकीनं, ज्या सूर्यकुलाला तुम्हीं पूज्य मानतां त्याची अपकीर्ति व्हावी अशी का तुमची इच्छा आहे ?

**प्रजा**—नाहीं महाराज, त्या कुलाच्या अभिमानाकरतांच आम्हीं असें वागतों.

**हरि०**—पण मीं हें राज्य संतोषानंच त्यांना दान दिलं आहे. त्याच्या आड तुम्ही येणं हा तुमचा धर्म नव्हे. जर माझ्यावर तुमचं खरोखर प्रेम असेल तर,

तुमच्या जवळ माझं हात जोडून मागणं आहे कीं, या हतभाग्याचं सत्त्व राखण्याकरतां तुम्ही इथंच रहा. कराच एवढे उपकार. देव तुमचं कल्याण करो—

देवावरती भार असूं द्या तो सुखदाता ॥ दीनावरती ममता असूं द्या अपुली आतां ॥

प्रजा०—श्रीहरी चुकलों तव सेवा। यास्तव वाटुनि तुज हेवा। हरिशि आमुचा सुखठेवा ॥

हरि०—राखी सकलां सुतवत् जन हे श्रीभगवंता ॥ देई शांती अमुच्या विरहें दुःखित स्वांता ॥

प्रजा०—ओस दिसे नगरी नृपते। भयाणशी छाया येते ॥ तात-माउली जणुं जाते। छत्र शिरचिं डळमळतें ॥

हरि०—त्वदिय महा-लोभ अहा। रडवि पहा वनिं जातां ॥



# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

( अरण्य—तारामतीच्या मांडीवर रोहिदास तळमळत आहे. )

**तारा०**—

**काय मी अभागिनी । पतिसुखा विदारिणी पापिणी ।**
**वैरिणी । मजपरी नसे कुणी ॥ उभय कुलकलंकिनी ।**
**सिद्ध होय दूषणीं ॥ छळि कुला पिशाच्चिनी जन्मुनी ।**
**वांचुनी । फुका जनीं ॥ सुकुमार माझें बाळ रानीं पाणी**
**पाणी करी ॥ थेंब न मिळे कंठ सुकला पडला धरणीवरी ॥**

**रोहि०**—आई, ताहनेनं प्राण कासावीस होतो आहे! कसंहि करून एक घोटभर तरी मला पाणी दे ग!

**तारा०**—बाळा, जरा धीर धर. पाण्याच्या शोधा करतांच महाराज गेले आहेत. आतां पाणी घेऊन येणं होईल.

**हरि०**—( प्रवेश करून ) छे : छे :! एक थेंबसुद्धां पाणी द्यायचं सामर्थ्य या हरिश्चंद्राच्या अंगीं उरलं नाहीं. तारामती, या प्रखर उन्हाच्या तापानं नदी, नाले पार आटून गेले आहेत. शिव शिव!

**काय ही दैवा दशा ये भाग्यशाली अशांला हाय कैसी ना**
**खुशाली सौख्यशाली अशाला ॥ शीत छाया ती विशाला**
**नसावी शिशूला ॥ हा कपाळा डाग आला पुण्यशाली यशाला ॥**
**घे सुशिला शोकशाला विसांवा कशाला ॥ हाय! काला पात्र**
**झाला पापशाली हंशाला ॥ तृषाक्रांता पाणि बाला दिसेना**
**दिशाला ॥ म्लान झाला जन्म दिधला कासया मीं अशाला ॥**

[ मायावी स्त्रीपुरुषांसह अन्य वेषानं विश्वामित्र येतो.

**विश्वा०**—अरे! हा तर पुण्यश्लोक राजा हरिश्चंद्र. वाहवा! अभाग्याला कामधेनुच भेटली म्हणायची?

**हरि०**—अहो ब्राह्मणश्रेष्ठ, आपण चुकतां. कामधेनूच्या ऐवजीं वांझ गाय भेटली असं म्हणा.

**विश्वा०**—म्हणजे–संकटग्रस्तांना साह्य करणारा, तूं राजा हरिश्चंद्र नव्हेस?

**हरि०**—या वेळीं मी नुसता नांवाचा हरिश्चंद्र आहें!

**विश्वा०**—एकूण औदार्याची आणि तुझी ताटातूट झाली म्हणायची?

**हरि०**—दुर्दैवानं पाडली म्हणायची!

**विश्वा०**—बोडक्याचें आलं आहे दुर्दैव! मनांतून कांहींच द्यायचं नसलं, म्हणजे दुर्दैवाचं रडगाणं गाणं, हा बहुतेकांचा नियमच आहे.

**हरि०**—भटजीमहाराज, आधींच विदीर्ण झालेलीं आमचीं अंतःकरणें अशा भाषणानं अधिक कां बरं दुखवतां? आम्हीं राज्यभ्रष्ट, वनवासीं, तेव्हां या वेळीं तुम्हांला काय साह्य करावं बरं?

**विश्वा०**—बाबारे, राजा उदार झाला तर अगणित द्रव्य देऊन संतुष्ट करील; पण गरीब उदार झाला तर, चिमुटभर धान्य तरी देईल कीं नाहीं?

**हरि०**—त्याला सुद्धां हल्लीं आम्हीं महाग झालों आहोंत! आम्हीं दुसऱ्याच्या ऋणांत असल्याकारणानें आम्हांला आपल्याकरतां देहसुद्धां खर्चीं घालतां येत नाहींत! मात्र आपण थकलां भागला असाल, तर घटकाभर अंगमेहेनत करून आपले श्रमपरिहार करूं. तारामति, या बाई गरोदर दिसताहेत, तेव्हां त्यांना कष्ट न पडतील, अशी त्यांची सेवा कर. कुमारा, तूं या ब्राह्मणपुत्रांची सेवा कर मी भूदेवांची सेवा करितों.

**विश्वा०**—राजा, तुम्हींहि त्रिवर्ग थकला आहां, तेव्हां ती सेवा वगैरे तूर्त राहूं द्या; पण या उन्हांत चालून चालून माझ्या पायांना फोड आले आहेत, यासाठीं तुझे तेवढे जोडे मला दे.

**हरि०**—आनंदानं देतों. हे घ्या महाराज. [ जोडे देतो.

**स्त्री**—( विश्वामित्रास ) झालं! आपल्याच पोळीवर तेवढं तूप ओढून आपलं तेवढं पोट जाळलंत, पण माझी काय वाट?

**तारा०**—बाई, देवतुल्य आपल्या पतीला असं बोलूं नये.

**स्त्री**—बोलूं नये, तर अप्पलपोटेपणा करूं नये. तुम्हीच सांगा बरं, मला हल्लीं नववा महिना. अशा कडक उन्हांतून एक कार्टं पोटांत नि एक कडेवर, अशीं दोन ओझीं मी सांभाळून नेऊं तरी कशी?

**विश्वा०**—खरंच राजा, माझ्या बायकोला अठरा पोरं झालीं—

**स्त्री**—मसणांत गेलीं! हें कुणीं विचारलं होतं?

**तारा०**—तर मग भाग्याचंच लक्षण हें!

**स्त्री**—चुलींत गेलं तें मेलं भाग्य! सगळे मेले दावेदार जन्माला आले होते. कुणी जन्माच्या अगोदर, तर कुणी जन्मल्यावर, कुणी वर्सानं तर कुणी दोन वर्सानं, अस्सं मेले वैर उगवून गेले. आतां फक्त हा शेवटचा राहिला आहे.

**विश्वा०**—आणि ही पुन्हां गरोदर आहे–म्हणजे एकोणिसावी वेळ! पण मागचा अनुभव पाहून पुढचा भरंवसा धरतां येत नाहीं! कारटं जन्मल्याबरोबर स्वतः मरून हिच्याहि मुळावर न येवो, म्हणजे जिंकलं.

**तारा०**—असं म्हणूं नका. आपण नेहमीं चांगलं चिंतावं. बरं बाई, तुम्हीं कष्टी होऊं नका. हें घ्या माझें पादत्राण.

**मुलगा**—अरेच्या! बाबांना जोडे मिळाले, आईला जोडे मिळाले, आणखी मी आपला कोरडाच!

**रोहि०**—ब्राह्मणपुत्रा, तुलाहि मिळतील.

**मुलगा**—पण ते–माझ्या आईबापाला मिळाले तसले पाहिजेत. बाबा रोज मला घरीं उठल्या बसल्या जोडे देत असतात, तसे मात्र नकोत हं.

**रोहि०**—काय? तुला रोज जोडे मिळतात?

**मुलगा**—हो ओ ओ ओ! बाबांच्या जोड्यांनीं समाधान नाहीं झालं, तर आळींतल्या मुलांकडून जोडे मिळतात. अरे, माझा खुराकच तो.

**रोहि०**—छेः! हें बरं नव्हे.–पण तुला शिकवायचा मला अधिकार नाहीं. हें घे माझें पादत्राण. [ देतो.

**विश्वा०**—देव तुम्हां सर्वांना पाहून घेईल! येतों आतां. [ जातात.

**हरि०**—अशा बिकट प्रसंगीं ब्राह्मणाचं संकट निवारतां आलं हें भाग्यच समजायचं. अरे ! पण या वावटळींबरोबर हा धुराचा लोट कुठून आला ?

**रोहि०**—महाराज, या वावटळीमुळं माझ्या डोळ्यांत धूळ गेली. मला कांहीं दिसत नाहीं. आई, तूं कुठें आहेस ?

**तारा०**—ही मी इथं आहें. आवाजावर इकडे ये. माझे डोळे पण धुरानं भरले आहेत.

**हरि०**—घात झाला ! हा तर सभोंवार वणवा पेटला आहे. तारामति, कुमारा, त्वरा करून वाट दिसेल तिकडे पळा आणि आपले प्राण वांचवा.

[ त्रिवर्ग तीन बाजूंनीं जातात.

---

## प्रवेश दुसरा

### ( तपोवनांतील रस्ता )

**विश्वा०**—( प्रवेश करून ) वाहवा ! वणवा पेटवून देऊन, तिघांची ताटातूट तर पाडलीच. आतां मीं मुद्दाम निर्माण केलेल्या पाणपोईजवळ प्रत्येकाची निरनिराळी भेट घेऊन त्यांना धर्मपोईचं पाणी पाजतों.

**भ्रष्ट न राजा जरिही अरिष्टं ॥ तारामतीला वळवीन कष्टं ॥**
**दोघे न झालीं लव सत्त्वहीन ॥ त्या रोहिदासा तरि वांकवीन ॥**

कसंहि करून तिघांपैकीं एकाला तरी सत्त्वभ्रष्ट केलंच पाहिजे.

**नारद**—( प्रवेश करून ) हो. हरिश्चंद्र नाहीं तारामति, तारामति नाहीं रोहिदास, रोहिदास नाहीं तर शेवटीं त्यांच्या आसपास फिरणारं एखादं कुत्रं तरी सत्त्वभ्रष्ट झालंच पाहिजे !

**विश्वा०**—आलांत ? या आगलावे !

**नारद**—आगलावे ? आगलावे मी का तुम्हीं ?

**विश्वा०**—तुम्ही ! इंद्राच्या दरबारांत हरिश्चंद्राचं यशोवर्णन करून तुम्हींच आग लावून माझ्या अंगाचा भडका केलात.

**नारद्**—तरी पण, या आगीच्या कामांत आपण आमचे गुरूच शोभाल. अहो, मी तुमच्या एकट्याच्याच अंगाला आग लावली, पण तुम्हीं तर हरिश्चंद्राचं राज्य घेऊन, त्याच्या सर्व प्रजेच्या अंगाला आग लावलीत ती लावलीत, पण उलट वणवा पेटवून गरीब बिचारे पशुपक्षी जाळून भस्म केलेत. तेव्हां आम्ही आगलावे कीं आपण आगलावे ? नारायण !

**विश्वा०**—अहो भक्तशिरोमणी, त्या नारायणाचं वर्णन करायला, आम्हीं सर्व ऋषीमुनी थकून गेलों, पण आपलं वर्णन करायला, तो नारायणहि थकून जाईल. कज्जेदलाल, आगलावे, कलहप्रिय, चहाडखोर कुठले !

**नारद्**—परब्रह्मार्पणमस्तु ! पण का हो विश्वामित्र ऋषि, तुम्ही ही नामावली माझी म्हणतां, कीं भगवंतांची म्हणतां ?

**विश्वा०**—उद्योगधंदा सोडून, कलागती लावीत घरोघर फिरणारे, एक सद्‌गृहस्थ आहेत, त्यांची ही नामावली आहे.

**नारद्**—असा तो कोण महात्मा पुरुष आहे बुवा ?

**विश्वा०**—तो का ? उभ्या शेंडीचा, वीणाधारी, गानप्रिय, असा तो असून सध्यां माझ्याजवळ उभा आहे, आणि आपल्या विषारी फुंकारानं माझा क्रोधाग्नि पेटवीत आहे.

**नारद्**—असो. त्या बिचाऱ्याचं परमेश्वर कल्याण करो.

**विश्वा०**—कल्याणाच्या ऐवजीं निसंतान करो, असं म्हणा ना !

**नारद्**—तसं म्हणा. ( स्वगत ) माझ्यासारख्या ब्रह्मचाऱ्याचं निसंतान तें काय होणार ?

**विश्वा०**—नारदमुनि, तुमची ही लावालावीची खोड जाणार तरी केव्हां ?

**नारद्**—पण तशी खोड माझ्या अंगीं असेल तर ती जाईल ना ?

**विश्वा०**—मग ही रिकामी उठाठेव कां ?

**नारद्**—मी तरी तेंच म्हणतों, कीं ही रिकामी उठाठेव तुम्हांला कां ? रस्त्यांतलं मढं मांडीवर घेऊन, छाती बडवून घ्यायचं तुम्हांला प्रयोजन काय ?

**विश्वा०**—काय ? मी रिकामी उठाठेव करतों ?

**नारद्**—नाहीं तर काय? हरिश्चंद्र सत्त्वशाली आहे—'आहे' म्हणा ना?

**विश्वा०**—कां म्हणूं?

**नारद्**—आम्ही सर्व सांगतों म्हणून.

**विश्वा०**—तुम्ही काय सांगतां! राईचा पर्वत करणारे तुम्ही! तुमचं सांगणं खरं मानावं कुणी? हा विश्वामित्र, अनुभवाशिवाय खरं खोटं कधींच म्हणणार नाहीं. मी हरिश्चंद्राला कसोटीला लावणारच!

**नारद्**—मग त्याचं राज्य घेऊन काय केलंत? ही कसोटीच नव्हे काय?

**विश्वा०**—अहो हा एक वळसा झाला.

**नारद्**—ठीक! असे वळसे देतां देतां, मुद्देमाल संपून तुमच्या हातीं दगड न येवो म्हणजे झालं.

**विश्वा०**—अहो शिष्ट, तुमच्याशीं अधिक वाद करायला मला फुरसद नाहीं. अथवा असं कशाला? लोचट लोकांना घालवण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां शहाण्या माणसानं आपण होऊनच तिथून जावं, हें ठीक.

**नको लोभ तो स्नेह पेशा जनाचा ॥**
**जयां ठाउकी नाहिं ती सत्य वाचा ॥**
**तुम्हीं सांगतां एकमेका निराळें ॥**
**जनीं लावितां भांडणें अल्पकाळें ॥**

[ जातो

**नारद्**—( हंसत ) 'मानोऽपि महतां धनम्' अशा कोटींतलीं हीं माणसं, तोंडघशीं पडल्याशिवाय वठणीला थोडीच येणार आहेत. असो. सर्व देवदेवतांना कळवून, त्यांच्यासह हें पुढील नाटक आपणहि पाहावं.

**संसार पाहे। निःसार आहे ॥ गृहधनदारा हें साधन नोहे ॥**
**निरहंकारें वाग मना रे। मी-पण सोडी भार न वाहे ॥**
**कमल जल तें घे न मलातें। कर्म करी परि मुक्तचि राहे ॥**
**या संसारा गणुनि पसारा। ज्ञानपथें जा लोभ न मोहें ॥**

---

## प्रवेश तिसरा

( **पाणपोई**—विश्वामित्राचा शिष्य पाणी भरीत आहे. )

**शिष्य**—मोठ्या माणसांचं प्रसरतं तें हें असं. 'मी येईपर्यंत पाणपोईची व्यवस्था कर' असं सांगून गुरुजी गेले ते गेलेच. विनाकारण मला मात्र घागरगडचा सुभेदार केला आहे. कोण शिंचा त्रास हा ? शिधासामुग्री गोळा करायची आम्हींच, स्वयंपाक करायचा आम्हींच, पाणी भरायचं—

**विश्वा०**—( प्रवेश करून ) काय ? अजून पाणी भरायचं आहे ?

**शिष्य**—न–न–नाहीं, पाणी केव्हांच भरलं. पण तें पाजूं कुणाला याचा विचार करीत होतों तोंच आपण आलां. ( स्वगत ) पाजूं का गुरुजींनाच पाणी ?

**विश्वा०**—तो बघ, राजा हरिश्चंद्र इकडे येत आहे त्याला हें पाणी पाजायचं. जा, आपल्या जागेवर बैस. खबरदार मधें एक शब्द बोललास तर.

**शिष्य**—हो ! कदाचित् त्याला ठसका लागायचा.

**विश्वा०**—अरे ! बोलूं नको म्हणतों ना ?

**शिष्य**—मनाशीं देखील गुणगुणूं नको ?

**विश्वा०**—कांहीं करूं नकोस.

**शिष्य**—कांहीं करूं नको ? मग पाणी कसं पाजतां येईल बुवा ?

**विश्वा०**—( हरिश्चंद्र येतो त्यास ) बाबा रे, तुझी मुद्रा म्लान झाली आहे तरी तुझं थोरपण कांहीं झांकत नाहीं. ये, असा छायेंत येऊन बैस.

**हरि०**—बसूं कशाला ? मला दुर्दैवानं सपशेल निजवलं आहे. महाराज, दुःखानं, विरहानं आणि या उन्हाच्या तापानं माझा घसा कोरडा पडला आहे, तर जवळपास एखादी नदी, विहीर असल्यास मला सांगा बरं.

**विश्वा०**—या अरण्यांत पाण्याचं नांव काढूं नकोस. तरी पण तूं घाबरूं नको. पाणी नसल्यामुळं या अरण्यांत पुष्कळ लोक 'पाणी पाणी' करून प्राण सोडतात, म्हणून मीं ही पाणपोई घातली आहे. करतां आंत येऊन मनसोक्त साखरपाणी घे.

**हरि०**—छेः ! धर्मार्थ ठेवलेलं पाणी कुणी प्याव ?

**विश्वा०**—ज्याचा घसा कोरडा पडला असेल त्यानं.

**हरि०**—पण प्राणांतींहि धर्मपोईचं पाणी न पिणारा मी क्षत्रिय आहें.

**विश्वा०**—बाबा रे, प्रसंगीं धर्मपोईचं पाणी प्याल्यानं धर्म तर बुडत नाहींच, पण, धर्म मोडतो म्हणून पाण्याकरतां जीव घालवणं, हा कांहीं शहाणपणा नाहीं. गृहस्था, अशा वेळीं धर्माकडे किंचित् काणाडोळा करावा.

**हरि०**—वाः, आपणासारख्या तपस्व्यानं असा सल्ला देणं, म्हणजे धर्माची विटंबनाच करणं होय. अहो, हत्ती ऊंस सोडून लांकडं खाईल काय ? मुंगी साखर टाकून माती खाईल काय ? सिंह कितीहि भुकेलेला असला, म्हणून तो गवत खाईल काय ? राजहंस कितीहि तान्हेलेला असला, म्हणून तो डबक्यांतलं पाणी पिईल काय ? छेः ! आपला स्वभावधर्म कधींच कुणी सोडणार नाहीं. ज्यानं सद्धर्माचा मार्ग सोडला, त्याच्या नशिबीं जिवंतपणीं क्लेश, दुःख, अपमान आणि तिरस्कार आहेतच, पण मेल्यावरहि अशा धर्मभ्रष्टाला भयंकर अशा रौरव नरकावांचून दुसरी गतीच मिळणार नाहीं.

**विश्वा०**—हं ! हें ब्रह्मपुराण लोकांना सांगायला ठीक आहे; पण प्राणावर बेतली, म्हणजे पुराणांतील वांगीं पुराणांतच ठेवावीं लागतात. बाबा रे प्रसंग पाहून वागणं हा धर्म, स्वार्थासाठीं क्रिया करणं हें कर्म, आणि विचार केलास तर तुलाहि वाटेल कीं हेंच सर्व शास्त्रांचं मर्म !

**हरि०**—आपल्या या एकंदर भाषणावरून, आपण ब्राह्मण नसून ब्राह्मण-वेषधारी चांडाळ आहां, असं वाटतं. काय करूं ? धर्माचं रक्षण करणारा राजदंड जर मीं सोडला नसता, तर अशा धर्मभ्रष्टाला या वेळीं मीं शासनच केलं असतं.

**विश्वा०**—अरे पण, माझं पुरं ऐकून तर घे—

**हरि०**—नको-नको यापुढं तुमचं भाषणसुद्धां नको ऐकायला.

**प्रखराग्निसम तव भाषण हें ॥ मज जाळित आहे ॥**
**धर्मनीतिच्या विरुद्ध ऐसें पाखंडी चांडाळ वदे ॥**
**महारौरवीं आपण पडुनी दुजास ओढी निजसवें ॥**

**चित्तमोहें ॥ स्मशानवासी प्रभो शुभंकर नीलकंठ गिरिजेशा ॥ पापताप हा नेई विनाशा ॥ मदीय चिंता तुजविणें कोण वाहे ॥** [ जातो.

**शिष्य**—ठीक, आमच्या गुरुजींनीं धरलेल्या तराजूच्या एका पारड्यांत हरिश्चंद्राचं सत्त्व आहे आणि दुसऱ्या पारड्यांत त्याचा छळ आहे. पण बहुत-करून सत्त्वाचं पारडं खालीं बसून आमच्या गुरुजींची भंबेरी उडणार खास. अरे पण हो! हरिश्चंद्राच्या वांटणीची साखर आपणच खाऊन टाकावी, नाहीं तर फुकट जायची. [ खाऊं लागतो.

**विश्वा०**—गद्ध्या, हें रे काय ?

**शिष्य**—कांहीं नाहीं बुवा! पुष्कळशी साखर पाहून, मुंग्याबिंग्या येतील, म्हणून त्यांच्या वांटणीची थोडीशी साखर मींच खाऊन टाकली.

**विश्वा०**—पण ती शिल्लक राहिली असती तर तुझ्या बापाचं काय नुकसान होतं ?

**शिष्य**—माझ्या बापाचं नुकसान नव्हे हो! पण म्हटलं, उरलेल्या साखरेचं ओझं, पाठीवरून नेण्यापेक्षां, पोटांतून नेलेलं काय वाईट ?

**विश्वा०**—पण काशीस गेल्यावर, तें ओझं तुझं पोट फाडून बाहेर काढावं लागेल, हें ठाऊक आहे ना ?

**शिष्य**—नाहीं गुरुजी! साखरेच्या पक्कानांचं ओझं माझ्या पोटाला मुळींच होत नाहीं; डोक्याला, पाठीला मात्र तें ओझं वाटतं. गुरुजी, क्षमा करा. पाठीवर मारा, पण पोटावर मारूं नका. पाहिजे तर मी आपली साखर परत करतों. [ ओकूं लागतो.

**विश्वा०**—गप्प बैस वात्रटा. ( पाहून ) हं. ती पहा, दुःखी कष्टी तारामती इकडे येत आहे, तिलाच मी हें पाणी पाजतों.

**शिष्य**—खरंच. बायकांची जात भोळीबावडी असते, तेव्हां तिला पाणी पाजलंत कीं, गुरुजी, भ्रष्ट होणार ती.

**विश्वा०**—बरं बरं, तूं आपल्या जागेवर बैस. ( स्वगत ) तरी पण हिला सत्त्वभ्रष्ट करण्यासाठीं दुजोरा यावा, म्हणून एक लटकाच हरिश्चंद्र मंत्रानं निर्माण

केला पाहिजे. ( तसें करतो. तारामति येते. ) बाई, तुझ्या मुद्रेवरून मला असं वाटतं कीं, तूं थोरामोठ्याची असून, फार श्रमली आहेस. तर थोडं साखरपाणी घेऊन घटकाघर आश्रमांत विश्रांति घे. चल.

**तारा०**—पण ही धर्मपोई दिसते.

**विश्वा०**—होय. धर्म करणं हें पुण्याचं लक्षण आहे.

**तारा०**—पण आम्ही धर्म घेणं, हें पापाचं लक्षण आहे.

**विश्वा०**—वेडी आहेस. संकटकाळीं, पापपुण्य, धर्माधर्म यांचा विचार जरा बाजूला ठेवावा.

**तारा०**—तर काय ? संकटकाळीं आपला धर्म बुडवावा ?

**विश्वा०**—अग, केवळ धर्म बुडवावा, असं माझं म्हणणं नाहीं, पण प्राणान्तापर्यंत धर्म जर नडूं लागला तर, आपत्काल म्हणून, धर्माचं बंधन जरा ढिलं करावं.

**तारा०**—ब्राह्मणाच्या वेषाखालीं अधर्म शिकवणाऱ्या ढोंग्या, पुरें तुझं हें धर्मपांडित्य! तूं ब्राह्मण नसून, धर्माचा नाश करूं पहाणारा, कुणी तरी दुर्जन, नास्तिक असला पाहिजेस. पण मी तुला निक्षून सांगतें कीं, स्वतः अधर्म करून, दुसऱ्यालाहि अधर्माकडे वळवणाऱ्या तुझ्यासारख्या पाप्याला सद्गति तर मिळणार नाहींच, पण चंद्र सूर्य आहेत तोंपर्यंत चालू असलेल्या नर्कवासाहून अधिक घाणेरडा असा नर्कवासच तुला भोगावा लागेल.

**विश्वा०**—बाई, रागावूं नकोस. आणखी थोडं माझं म्हणणं ऐक. प्रसंगानुसार धर्माचं बंधन ढिलं किंवा घट्ट करणं, हें आपल्या हाती आहे; असं म्हणणारा या जगांत मी एकटाच नाहीं. नवखंड पृथ्वींचं धर्मानं पालन करणारा धर्माचा शास्ता, असा राजा हरिश्चंद्र–तो पहा–माझ्या धर्मपोईंत प्रसंग पडतांच धर्माचं पाणी पीत बसला आहे.

**तारा०**—काय ? अयोध्याधिपती हरिश्चंद्रमहाराज, या धर्मपोईचं पाणी पिताहेत ? छे, छें, असं कधींहि होणार नाहीं. महाराज, मी आपल्याला निश्चयानं सांगतें, कीं, कदाचित् पूर्वेचा सूर्य पश्चिमेला उगवेल, सागर आपली मर्यादा सोडील, आकाश कोसळून पडेल, चंद्र–सूर्याला अकालीं ग्रहण लागेल, नक्षत्रांचा

पाऊस पडेल, पण रविकुलामधें उत्पन्न झालेले, सत्त्वशील, पुण्यशील, धर्मशील माझे पति हरिश्चंद्रमहाराज, या पाणपोईंत प्राणांतींहि आपलं पाऊलसुद्धां ठेवणार नाहींत.

**विश्वा०**—हा तुला भ्रम आहे. पण मी सांगतों—

**तारा०**—मुळींच कांहीं सांगूं नका. उलट मीच तुम्हांला अखेरचं सांगतें:

**साध्वी कधिंहि नच ढळे ॥ कधिंहि नच ढळे । न सोडि सत्त्व आपुलें ॥**
**त्रिजगराज्य जरि मिळे ॥ करितिल कुछल दुर्जन खल धूर्त कुटिल ते ॥**
**मोहितील फसवितिल परि न डळमळे ॥ त्यांतुनि मी कुलवंता ॥**
**सत्त्वधीरनृपकांता ॥ पुण्यकीर्ति राजसुता ॥ आर्यसुताची माता ॥**
**या अशा आमिषा काय ही भुले ॥ काय ही भुले, न सोडि सत्त्व० ॥**

**शिष्य**—( स्वगत ) अहाहा! काय पण आमच्या गुरुजींचा चेहरा झाला आहे? या वेळीं जर कोणी याचं चित्र काढलं, तर आंबट चेहरा कसा असतो, हें जगाला हुबेहुब दाखवतां आलं असतं. असो. हरिश्चंद्राच्या वांटणीची साखर मघां कशीबशी पचवलीच, आतां गुरुजींची तंद्री लागली आहे, तोंच तारामतीच्या वांटणीची साखर चट्टदिशीं गट्ट करून पट्टदिशीं मोकळं व्हावं.

[ चोरून साखर खातो.

**विश्वा०**—( कान धरून ) माणसाच्या कांद्या, तोंच अधाशीपणा पुन्हां ?

**शिष्य**—नाहीं गुरुजी. तहान लागली होती, तेव्हां म्हटलं अनशेपोटीं पाणी प्यालों तर नळ भरतील, आणि गुरुजी, तुम्हांला त्रास होईल-हो-नळ रगडावे लागतील, म्हणून थोडी साखर खाल्ली, आणखी आतां पाणी पिणार, तोंच तुम्हीं माझा कान धरला.

**विश्वा०**—इतक्यानंच नाहीं भागणार. ते नळ सारखे व्हायला शंभर उठबशा काढ पाहूं. हं, कर सुरू.

**शिष्य**—करतों गुरुजी सुरू. एक, पांच, बारा, पस्तीस, एकसष्ट,—

**विश्वा०**—ऑं!

**शिष्य**—बासष्ट.

**विश्वा०**—काय ? इतक्यांत बासष्ट ?

**शिष्य**—चलाखी केली गुरुजी.

**विश्वा०**—अरे, चलाखीच्या चौसष्ट कला जाणणाऱ्या गललेट्टा ! तर मग आतां आंगठे धर. (धरल्यावर) यंव ! आतां अगदीं खरोखरीचाच गाढव दिसतोस.

**शिष्य**—पण गुरुजी, त्या रोहिदासानं जर हें माझ्यासारखं बोलकं गाढव पाहिलं, तर त्याला काय वाटेल ?

**विश्वा०**—काय वाटेल रे मुर्खा ?

**शिष्य**—त्याला वाटेल कीं, नंदीपुढं नंदीनाथ महादेव असतो, पण या बोलक्या गाढवापुढं, हा कोणता गाढवनाथ ?

**विश्वा०**—चूप बैस वात्रटा. जा, जाग्यावर जाऊन बैस. ( स्वगत ) या कपट-वेषधारी हरिश्चंद्राच्या जोडीला तशीच एक तारामति बसवली पाहिजे, तरच हें कारटं फसेल. ( तारामती बसल्यावर रोहिदास येतो, त्यास कळवळ्यानें ) कोण रे तूं ?

**रोहि०**—आपल्या परमपूज्य आई-बापांना मुकलेला मी अभागी रोहिदास आहें.

**विश्वा०**—कोण ? हरिश्चंद्र राजाचा मुलगा रोहिदास तो तूं का ? हा वेड्या ! मग तूं अभागी कसला ? ते बघ, तुझे आई-बाप तुला शोधून थकल्यामुळं माझ्या या आश्रमांत पाणी पीत बसले आहेत.

**रोहि०**—काय माझे आई-बाप या धर्मार्थ पाणपोईंत पाणी पिताहेत !

**विश्वा०**—इतकंच नव्हे, तर साखर खाऊन पाणी पिऊन ढेंकर देताहेत.

**रोहि०**—खोटं—अजिबात खोटं. प्रत्यक्ष धर्म आपला धर्म सोडील, पण देवतुल्य माझे वडील कधींहि आपला धर्म सोडून पाप जोडणार नाहींत.

**विश्वा०**—पण तुला अर्भकाला पाप-पुण्य जाणण्याची अक्कल तरी आहे ?

**रोहि०**—अकलेचं प्रमाण वयावर किंवा माणसाच्या लांबी-रुंदीवर असतं कीं काय ? महाराज, पाप कोणतं आणि पुण्य कोणतं हें मला चांगलं कळतं.

**विश्वा०**—तर मग, तें पाप कसं आणि कुठं आहे तें दाखीव पाहूं.

**रोहि०**—आपण थोर असून ब्राह्मण आहां, तेव्हां चांगल्या फुलाचा वास आपणच मला दाखवा पाहूं.

**विश्वा०**—वेड्या, वास ही दिसणारी वस्तु नसून इंद्रियानं जाणायची वस्तु आहे.

**रोहि०**—त्याचप्रमाणं पाप हेंहि दिसणारं नसून, जीवात्म्यानं भोगायची वस्तु आहे.

**विश्वा०**—पण शहाण्या, तुझ्या आई–बापांना या गोष्टी कळतच नाहींत वाटतं ?

**रोहि०**—अलबत कळतात. पण तुम्हीं दाखवतां ते माझे आई–बापच नव्हत. कारण, माझे आई–बाप या धर्मपोईचं पाणी पिऊन आपल्या औदार्यशाली कुलाला कधींहि कलंक लावणार नाहींत. आपण मला फसवूं नका. महाराज, माझ्या आई–बापांना पक्कं ठाऊक आहे—

**निजकुला कलंकित करणें। पशू–परी तया गणणें॥**
**शास्त्रपुराणें वदती विगुणें। धर्मसखा सोडुं नका।**
**त्याहुनी बरें मग मरणें॥ धर्म सोडितां कर्म मोडितां॥**
**पुण्य झडे पाप जडे। नरकांत अंतिं मग पडणें॥**

[ जातो.

**विश्वा०**—अरेच्या ! बापसे बेटा सवाई.

**शिष्य—**मग यांत काय नवाई ? बापसे बेटा सवाई, आज्यापेक्षां नातू सवाई, सासूपेक्षां सून सवाई आणि, गुरूपेक्षां शिष्य सवाई !

**विश्वा०**—चूप मूर्खा. राजा हरिश्चंद्रा, तूं थोर खराच, पण भाग्यवानहि आहेस. तुझी स्त्री आणि पुत्र म्हणजे दोन अमोलिक रत्नंच ! असो, आतां या तिघांची भेट करवून यांना काशीला जाऊं द्यावं. तोंपर्यंत आपण गुप्तरूपानं अयोध्येस जाऊन त्या मूर्खाचा राज्यकारभार पहावा. ( उघड ) चल रे शंखोबा, त्या नालायकाचा राज्यकारभार पहायला चल.

**शिष्य**—गुरुजी, तो अजगरभट जर राज्य करायला नालायक आहे, तर मग माझ्यासारख्या एखाद्या लायक मनुष्यालाच तें राज्य द्या ना.

**विश्वा०**—मूर्खा, राज्यें काय वाटेवर पडलीं आहेत, कां झाडाला लागलीं आहेत ?

**शिष्य**—तसं नव्हे गुरुजी, तुम्ही कुणाच्याहि स्वप्नांत गेलांत कीं, तुमच्या हातांत राज्य पडतं; म्हणून म्हणतों.

**विश्वा०**—पण शहाण्या, स्वप्नांतला प्रत्येक शब्द खरा करणारा हरिश्चंद्र कोट्यावधि जगांत एखादाच असतो.

**शिष्य**—तर मग, आम्ही आपले मरेपर्यंत शिष्य एके शिष्य आणि शिष्य दुणे भिक्षुकच राहणार गुरुजी. [ जातात.

---

## प्रवेश ४ था

( **जंगल–रस्ता** : हरिश्चंद्र प्रवेश करितो. )

**हरि०**—एकूण दुर्दैवानं सर्व तऱ्हेनं पाठ पुरवली आहे. हजारों शत्रूंचा मारा–फार काय, पण प्रत्यक्ष श्रीविष्णूचं सुदर्शन चक्रहि आंवरून धरवेल; पण हें दुर्दैवाचं फिरतं चक्र कोणालाहि आंवरून धरतां येणार नाहीं. प्रत्यक्ष भगवंतालाहि या दैवानं जन्म–मरणाच्या फेऱ्यांत गुंतवलं. दैवा, तूं आहेस तरी कोण

**तारा०**—( प्रवेश करते ) मी कर्मचांडाळीण तारामती !

**हरि०**—कोण, तारामती ? तर मग दैवानं खैर केला ! लाडके ये—

**तारा०**—दूर–दूर उभे रहा. देवा, हें आहे तरी काय ? पुन्हां तेंच दर्शन ? माझ्याभोंवतीं ही माया तर पसरली नाहीं ना ?

**हरि०**—काय हा भलताच संशय ? लाडके, तुझा पति मी हरिश्चंद्र ना ? साध्वी, तूं भ्रमिष्टासारखं काय करतेस ?

**तारा०**—काय ? हा भ्रम ? स्वप्न ? कीं मायेचा भास ? मला फसवूं नका. साध्वीला फसवल्याचं फळ भोगावं लागेल. माझ्या अंगाचा स्पर्श माझ्या पतीशिवाय इतरांचं भस्मच करील.

**हरि०**—तथास्तु ! तूं तशीच साध्वी आहेस. ये बरं मला कडकडून भेट.

**तारा०**—महाराज, मी आपल्याला ओळखलं नाहीं. मला क्षमा करा. पण महाराज, माझा बाळ रोहिदास कुठें आहे ?

**रोहि०**—( प्रवश करून ) हा पहा मी इथें आहें. पण तुम्ही कोण ?

**तारा०**—अहाहा देवा ! काय रे आनंदाचा दिवस दाखविलास ! बाळा,ये रे ये, मला कडकडून भेट.

**रोहि०**—दूर, दूर उभी रहा; खबरदार माझ्या अंगाला स्पर्श करशील तर.

**तारा०**—बाळ, तुझ्या शोधाकरतां रानावनांत वणवण फिरणारी मी तुझी आई ना ? मग अशा वेळीं मला भेटायचं सोडून असा दूर दूर कां सरतोस ? लाडक्या—

**रोहि०**—जिकडे तिकडे माया पसरली आहे. त्या मायापाशांत मला गुंतवून माझं सत्त्वहरण करूं पाहतां होय ?

**हरि०**—बाळ, आपल्या प्रजेकडूनहि सत्त्व न ढळविणारे हे तुझे आई–बाप प्रत्यक्ष आपल्या मुलाला सत्त्वभ्रष्ट करतील काय ?

**रोहि०**—कपटवेषानं त्या पाणपोईत पाणी पिणारे तुम्हीच ना हरिश्चंद्र नी तारामति ? जा, जा, राजा हरिश्चंद्र आणि राणी तारामति यांचा पुत्र रोहिदास अशा या मायापाशांत कधींहि फसणार नाहीं.

**तारा०**—तर मग त्या मायापाशांत माझं बाळहि गुंतलं होतं म्हणायचं ! बाळ, त्या मायापाशांत मीहि फसणार होतें, पण महाराजांच्या पुण्याईनेंच निभावलें.

**रोहि०**—असल्या गोड गोड भाषणानं मी कधींहि फसणार नाहीं. माझ्या कुलाचा आदिपुरुष जो भगवान् सूर्यनारायण त्याची तुम्हांला शपथ आहे. तुम्ही खरोखरच माझे आई–बाप काय ?

**हरि०**—तर मग त्याच भगवंताची शपथ—आम्हीं खरोखरच तुझे आईबाप आहोंत.

**रोहि०**—तर मग मीच तुमचा पुत्र रोहिदास आहें. (भेटून) आई, मला वाटतं आपल्याला फसविण्याकरितां कुणीं तरी ती माया उत्पन्न केली होती, नाहीं बरं ?

**हरि०**—होय बाळ. चला, आपल्या कुलाचं सत्त्व आपणच राखलं म्हणून त्या कुलदेवतेची पार्थना करूं नी त्रिवर्ग काशीचा मार्ग धरूं. [ जातात.

———

## प्रवेश ५ वा

( **महाल**—राज्यवैभवानं नटलेला अजगरभट व दुसरा शिष्य बोलत येतात. )

**भट**—हं. बोल, काय पाहिजे तुला ! अंगांत घालावयाला बंडी पाहिजे ? नेसायला पंचा पाहिजे ? माझी जुनी कानटोपी पाहिजे ? नको ? कांहीं नको ? मग पाहिजे तरी काय ? दोन चार पैसे उसने पाहिजेत ? घे. मागून घे. हल्लीं मला कांहीं कमताई नाहीं. कां रे, तूं असा मुखस्तंभ कां ?

**शिष्य**—तुझ्यासारख्या कवडीचुंबक राजाजवळ काय मागावं, याचा विचार करतों आहें.

**भट**—विचार कसला करतोस ! मीच सांगतों. तुला एखादं हरणाचं कांतडं, दर्भाची जुडी, फार झालं तर—काशी विश्वेश्वराय नमः म्हणून, भीक मागायला एखादी तपेली—

**शिष्य**—झाली आठवण गड्या.

**भट**—ए, आतां तूं मला गड्या बिड्या म्हणूं नकोस. कसा झालों तरी मी हल्लीं 'महाराजाधिराज राजमान्य श्रीमंत राजेश्री गुणमंडित विखंडित सकलकलोदरपरायण भूगोल—खगोल पालक' असा मी राजा आहें राजा !

**शिष्य**—म्हणूनच मी एक ढोलकं मागतों आहें.

**भट**—ढोलकं ! तें रे कशाला ? ढोलकं घेऊन तूं काय करणार ?

**शिष्य**—तुला बरोबर घेऊन, गुबुगुबु करीत नंदीबैलाची मिरवणूक काढणार !

**भट**—आहे,—तो एक धंदा आहे. पण बरोबर मी कशाला ?

**शिष्य**—अरे, तूं बरोबर असलास म्हणजे दुसरा एखादा बैल घेऊन तो शृंगारायाला नको. तुझ्यावरच काम भागवून घेईन. [ हंसत जातो.

**भट**—चल मूर्ख कुठला ! भटभाई भिक्षुकच तूं—तुला अरसिकाला आम्हां राजे लोकांचा थाटमाट कसा कळणार ? अरे पण ही कोण ? अं ? नखशिखान्त इतकी नटली आहे कीं, हिचं मूळचं अंग शोधायला हातानं चांचपडलंच पाहिजे. बरं, त्या दागिन्यांचीं नांवं घ्यायला सबंध ऋग्वेद पालथा घातला पाहिजे, आणि ते दागिने घालावयाचे अवयव सांगायला सबंध आयुर्वेद शोधला पाहिजे.

**स्त्री**—( नटून येते ) म्हणजे ? दागिन्यांचीं नांवं नि त्यांचीं ठिकाणं वेदामधें का सांगितलीं आहेत !

**भट**—हो तर–तर, हा चंद्रहार, सूर्यहार, इंद्रहार, वरुणहार, इत्यादि हारांची माळच्या माळ ऋग्वेदांत सांपडेल; आणि नाक, तोंड, कान, मान, छाती, कंबर इत्यादि सर्व अवयवांचीं नांवं आयुर्वेदाशिवाय कुठं सांपडतील ? अबब ! अरे हें काय नटणं कीं मंगळागौर सजवणं ?

**स्त्री**—बाई, बाई, बाई, बाई ! हें काय राजे होणं कीं नंदीबैल मढवणं ?

**भट**—काय, मी नंदीबैल ?

**स्त्री**—नाहीं तर काय ? हे कपडे का बैलाच्या अंगावरच्या झुली ? हे हार का बैलाच्या गळ्यांतल्या घुंगुरमाळा ? हें पागोटं का बैलाच्या डोकीवरचं बाशिंग ? हे तुरे का बैलाच्या शिंगांवरचे गोंडे ?

**भट**—शहाणीच तूं ! अग, मीं जर हे अलंकर घातले नाहींत तर मला राजा कोण म्हणेल ?

**स्त्री**—आणि मी जर अशी नटलें थटलें नाहीं, तर मला राणी कोण म्हणेल ?

**भट**—अग पण खुळे, मी राजा म्हणून तूं राणी; तेव्हां तूं मुळींच नटली नाहींस तरी चालेल. अगदीं कैकाडणीसारखी दिसलीस तरी तूं राणीच.

**स्त्री**—पण या कैकाड्याचीच राणी ना ? मी नाहीं बाई तशी दिसायची. मला पाहतांच मी थोरामोठयांची आहें, असं चारचौघींना दुरून वाटलं पाहिजे.

**भट**—आणि म्हणूनच तुझ्या पायांत घालण्याकरतां तोडे आणले आहेत.

**स्त्री**—खरं कीं काय? माझ्याकरतां मुद्दाम का तयार केले?

**भट**—छे, छे, हरिश्चंद्रराजा ज्या हत्तीणीवर बसत असे, तिच्या पायांतले ते तोडे आहेत?

**स्त्री**—म्हणजे! हत्तिणीच्या पायांतले तोडे माझ्या पायांत!

**भट**—हो! हो! अग, पशूंच्या पायांत जर असले तोडे घातले तर मग आमच्या राणीसाहेबांनीं कसले तोडे घालायचे? कोण आहे रे तिकडे? ते तोडे आणा इकडे.

**स्त्री**—तर मग या तुमच्या प्रेमाच्या देणगीबद्दल मीं देखील दोन तुरे आणले आहेत तुरे!

**भट**—म्हणजे? ते तूं स्वतः तयार केलेस कीं काय?

**स्त्री**—छे छे, तारामति ज्या रथांत बसत असे त्या रथाच्या घोड्यांच्या डोक्यावरचे हे तुरे आहेत.

**भट**—भले शाबास! घोड्यांच्या डोक्यावरचे तुरे माझ्या डोक्यावर?

**स्त्री**—मग? हत्तिणीच्या पायांतले तोडे माझ्या पायांत? अहो, असले बहुमोलाचे तुरे जर जनावरांनीं घातले तर मग आमच्या राजेसाहेबांनीं काय घालायचं. कोण आहे ग तिकडे, ते तुरे आणा इकडे.

**भट**—तर मग कोण आहे रे तिकडे? ते तोडे आणा इकडे.

[ दासदासी तोडे व तुरे आणतात व ते परस्परांस घालतात.

**भट**—यंव! आतां सर्व जुळलं. चार पावलं टाका पाहूं. आस्ते–आस्ते–आस्ते कदम! राणीसाहेब, तोल सांभाळा नाहींतर डौल जाईल. वाः फारच सुंदर दिसतां राणीसाहेब!

**स्त्री**—आणि आपणहि फारच खुपसुरत दिसतां राजेसाहेब! जरा तरवार फिरवा पाहूं. ( फिरवतो ) अग बाई! पुरे! पुरे! पुरे!

**भट**—कां? भ्यालीस वाटतं?

**स्त्री**—किती पण भ्यालें मी! मला वाटलं होतं, कीं तुम्ही भिक्षुक भाई, जन्मांत तरवार ठावी नाहीं;–मग फिरवितां कशी येईल बाई? पण, मी आतां

अगदीं दिपून गेलें हो! तरी म्हटलं पुरुषांच्या डोक्यावर घोड्यांचे तुरे कां? तर जरी तरवार फिरवितां येत नसली, तरी नंदीबैलाप्रमाणं मान हलवतांना तुरा चमकावा नि शत्रूला तरवार चमकल्याचा भास व्हावा. काय ग बाई तरी दूर दृष्टी ही!

**हुजऱ्या**—( प्रवेश करतो ) महाराज, बाहेर प्रधानजी आले आहेत.

**भट**—तर मग गोषांत-गोषांत जा. महालांत प्रधानजीचं काय काम बुवा? प्रधान, सेनापती, सरदार, दरकदार, मानकरी, भालदार, चोपदार, हुजरे यांनीं दरबारांत भेटावं, आणि आम्ही एकदां महालांत आलों कीं, प्रधानीण, सेनापतीण, दरकदारीण, मानकरीण, भालदारीण, चोपदारीण, हुजरीण यांनीं भेटायला आलं पाहिजे.

**हुज०**--ठीक आहे. सांगतों तर मग असं.

**भट**—थांब, आणखी तुलाहि सांगतों गुलामा, आम्हीं दरबारांत असतांना तूं येत जा. आणि आम्ही एकदां महालांत आलों म्हणजे तूं आपल्या बायकोला पाठवीत जा.

**हुज०**—काय? माझ्या बायकोला पाठवूं? भलतंच! असं कसं होईल?

**भट**—अलबत! असं झालंच पाहिजे. नाहीं तर आम्ही राजे कसले?

**हुज०**—बरं आहे, सांगतों प्रधानजींना असं.

**भट**—अरे, अरे, अरे! आतां नको सांगूं. मीच सांगेन केव्हां तरी. तूं फक्त त्यांना इकडे पाठवून दे. (हुजऱ्या जातो.) हा शिंचा प्रधानजीला भलतंच सांगायचा, आणि तो प्रधान आमची शोभा करायचा! नकोच तें.

**प्रधान**—( प्रवेश करतो. ) अरे बापरे! याला ऐश्वर्य भोगणं म्हणावं कीं, ऐश्वर्याचा उपहास करणं म्हणावं? (उघड) महाराज, सरकारांतून ब्राह्मणांना वार्षिक दक्षणा देण्याचा दिवस उद्यांचा असल्यामुळं आपली मंजुरी मिळावी.

**भट**—घ्या आमची मंजुरी. पण लक्षांत ठेवा, त्या ब्राह्मणांच्या यादींत सर्वांच्या वर पहिलं नांव माझं लिहा.

**प्रधान**—म्हणजे?

**भट**—म्हणजे ! अहो म्हणजे काय ? मोठी दक्षणा पहिल्यानं मलाच मिळेल.

**प्रधान**—महाराज, आपण राजे महाराजे, तेव्हां आपण असं बोलूं नये. वर्षासन दिलंच पाहिजे. नाहीं तर राज्याची अब्रू जाईल.

**भट**—अब्रूच जात असेल तर प्रत्येक ब्राह्मणाच्या हातावर एकेक पैसा द्या आणि त्यांना आनंदानं रवाना करा.

**प्रधान**—भलतंच कसं होईल महाराज ? रीतीप्रमाणें पंचक्रोशींतल्या प्रत्येक ब्राह्मणाला पांच पांच मोहरा दिल्याच पाहिजेत.

**भट**—अरे बापरे ! पांच पांच मोहरा,—आणि प्रत्येक ब्राह्मणाला ? भले शाबास ! अशानं लवकरच हें राज्य आम्हांला विकावं लागेल, नाहीं तर एखाद्या सावकाराजवळ गहाण ठेवावं लागेल. [ खासगी कारभारी येतो.

**कार०**—महाराज, नगरशेटच्या इथं लग्न असल्याकारणानं, पानसुपारीकरतां आपली पायधूळ झाडावी अशी त्याची विनंति आहे.

**भट**—पानसुपारी करतांच जायचं ? अँ ! दक्षणेचं किंवा भोजनाचं आमंत्रण गोषांत नाहीं का हो कारभारी ?

**कार०**— आपण राजे तेव्हां आपण असं बोलूं नये.

**भट**— अरेच्या ! हे प्रधान आमच्या खजिन्यांतले पैसे ब्राह्मणांना वांटतात तरी आम्हीं बोलूं नये. बरं, तुम्ही आमची दक्षणा आणि भोजन बुडवितां तरी आम्हीं बोलूं नये ! वाः मुळींच बोलयाचं नाहीं मग आम्ही राजे कसले ? बुद्धिबळां-तले कीं काय ? [ सेनापती येतो.

**सेनापति**—महाराज. [ तरवारीनं मुजरा करतो.

**भट**—( भिऊन ) अग आई ग !–सेनापति, तुम्हांला शंभरदां सांगितलं कीं,–( बायकोस ) गोषांत जा.–नागव्या तरवारीनं मला मुजरा करूं नका म्हणून. म्हणजे मी भितों अशांतला प्रकार नव्हे हो ! पण न जाणो, बोलून चालून हत्यार तें. चुकून कुठं भलतीकडे लागलं तर काय करायचं ? घाला पाहूं ती तरवार गोषांत–अँ हं कोषांत. हं, आतां बोला पाहूं का आलां होतां ?

**सेना०**—उत्तरेकडील दांडगट रानटी लोकांनीं बंड केलं आहे सरकार, बंड.

**भट**—बंड ? तर मग झालों आम्ही थंड ! अरे बापरे ! कसले तरी पागल लोक हे ? विनाकारण बंड कशाला करतात. चोऱ्या कां करीत नाहींत ? हें पहा सेनापती, त्यांना काय हवं असेल तें द्या, पण म्हणावं बंडबिंड कांहीं करूं नका !

**सेना०**—पण महाराज, यांत राज्याची अब्रू जाते. त्यांची खोडच मोडली पाहिजे.

**भट**—तर मग ती तुम्हीच मोडा. पाहिजे तर सरसकट सर्वांना फांशी द्या, पण आम्हांला त्रास न होईल असं करा माझ्या बाप्पा ! ( स्वगत ) आमच्या बायकोला सांगून वाड्याच्या दरवाज्यावर मुकटे तरी बांधून ठेवले पाहिजेत. म्हणजे ते बंडखोर सोवळयाला भिऊन आंत तरी शिरायचे नाहींत ! कठिण बुवा हें राजेपण ! [ कोतवाल येतो.

**कोत०**—महाराज, आपल्या नगरांत चोरांनीं फार दंगा मांडला आहे.

**भट**—मग, तुम्हीं काय बायकोभोंवतीं पिंगा घालतां, कीं तिच्याशींच दंगा करतां ? चोरांना पकडून तुरुंगांत घालतां येत नाहीं ?

**कोत०**—पण आम्हीं सज्ज होऊन त्यांना पकडायला जाण्यापूर्वींच ते पळून जातात, मग काय करावं ?

**भट**—लुगडं नेसून टाळ्या वाजवीत बसावं ! भागुबाई कुठचे ! जा. त्या चोरांना म्हणावं तुम्हीं चोऱ्या करायला शेजारच्या गांवीं जा.

**कोत०**—तरीपण तीं आपलींच गांवं सरकार. तेव्हां गस्तवाल्यांना सरकारांतून चांगलीं हत्यारं मिळण्याचा हुकूम व्हावा.

**भट**—मग, द्या कीं—खुशाल द्या. वाटेल तर प्रत्येक शिपायाच्या हातांत एक भली जंगी तोफ द्या. पण त्यांना शपथ घालून सांगा कीं, तोफा ज्या उडवाल त्या आमच्या वाड्याकडे पाठ करून, गांवाबाहेर मैदानांत उडवीत जा. जा आतां आणि अशा भयंकर बातम्या माझ्या परवानगीशिवाय आणूं नका. ( गेल्यावर, स्वगत ) या भयंकर बातम्या ऐकतां ऐकतां त्रासून गेलों बुवा. नको हें राजेपण असं झालं आहे. काय ग, आहेस ना ठिकाणीं ? का बंडखोरांनीं खंडणी म्हणून तुलाच नेली.

**स्त्री**—माझी नको काळजी. स्वतःचाच विचार करा म्हणजे झालं.

**भट**—तोच करतों आहें. बंडखोर तुला न्यायचे आणि चोर मला चोरायचे, मिळून दोघांनाहि भीतीच. ( हुजऱ्यास ) काय रे, तूं कसा आहेस ?

**हुजऱ्या** – ठीक आहे सरकार.

**भट**—गाढवाच्या लेका, तुला कांहीं बादिक भरली नाहीं हें मलाहि दिसतं आहे. पण तूं चोर आहेस कीं बंडखोर आहेस !

**हुज०**—मी चोरहि नाहीं आणि बंडखोरहि नाहीं.

**भट**—तर मग हरामखोर आहेस ! थांब, मी तुझा झाडा घेतों. हात वर कर; दुसरा हात वर कर. पाय वर उचल. दुसरा पाय उचल. दोन्ही पाय उचल. इकडे तोंड कर; तिकडे तोंड कर. खालीं बैस, वर ऊठ. पुन्हां बैस. ऊठ. (हंसतो) आतां सांग पाहूं, तूं काय काय चोरलंस तें ? दागिने ? कपडे ? राजवाडा चोरलास ? मोठी विहीर चोरलीस ? मोतीबाग चोरलास ? अँ ! असा नन्नाचा पाडा काय वाचतोस गुलामा ? चल निघ इथून, आणि वाड्याचा असा बंदोबस्त ठेव कीं मुंगीसुद्धां आंत शिरतां कामा नये. अरे ए, ते चोर बंडखोर जर आले, तर हा राजवाडा ओसाड आहे म्हणावं. आणि पहा, या वाड्यांत भुतं खेतं नाचतात म्हणावं. म्हणून हा राजवाडा भाड्यानं देणं आहे म्हणावं. आणखी म्हणावं–म्हणावं–तुला काय सुचेल तें म्हणा .

[ हुजऱ्या जातो व विश्वामित्र येतो.

**विश्वा०**—काय रे ए गध्या, हा काय गोंधळ मांडला आहेस ? तुला राज्य संभाळण्याकरतां प्रतिनिधि म्हणून ठेवलं आहे, कीं हें कपड्यांचं ओझं वहाण्याकरतां गाढव म्हणून ठेवलं आहे ?

**भट**—असं–न–न–नव्हे गुरुजी. मी रोज स्नान करतों, संध्या करतों, देवपूजा करतों—

**विश्वा०**—पोटभर जेवतों !–हेंच करतोस कीं नाहीं ? मूर्खा, राज्यकारभार पाहणं, म्हणजे काय स्नानसंध्येचा बाजार मांडणं होय ? कां रे, हुम्यासारखा उभा कां ?

**भट**—नाहीं गुरुजी, मी कुठं चुकलों, याचा विचार करतों आहें. पण मी म्हणतों, मला शत्रु होणार कोण ! मी तर मारे ब्राह्मणभोजन घालून, पैसा पैसा दक्षणा देऊन सर्वांना संतुष्ट करीत असतों.

**विश्वा०**—अकलेचा खंदकच आहेस. शहाण्या, राज्यकारभार संभाळणं

म्हणजे काय ब्राह्मणभोजन घालणं ? मूर्खा, आतां तरी सावध राहून कांहीं शहाणपणानं चाल. नाहीं तर तुझी उचलबांगडी करावी लागेल.

**शिष्य**—अर्थात् राज्याचा वारस मला व्हावं लागेल.

**विश्वा०**—चल रे शंखोबा, माझ्याबरोबर काशीला चल.

**शिष्य**—गुरुजी तरी कसे विलक्षण आहेत ? या मूर्खाला केला आहे राजा आणि मी शहाणासुर्ता असून, विनाकारण प्राण घेताहेत माझा. नशीब ! [ जातो.

**स्त्री**—कां ? बरी झाली कीं नाहीं गुरुजींकडून शोभा ?

**भट**—अर्रेरे ? हें ऐकायला ही कशाला इथं जिवंत राहिली ? तिकडं मेली कां नाहीं ? ( उघड ) तुझ्यामुळें हें सगळं झालं, समजलीस. ( स्वगत ) आमचे गुरुजी वरचेवर इकडे येतात कशाला कोण जाणें. आणखी आठ हजार वर्षे तप करायला कुठें निघून कां जात नाहींत ? छे. छे. छे. कठीण बुवा हें राजेपण ! मी हंगामी राजा जर इतका त्रासलों, तर खऱ्या राजांना किती त्रास असेल ! झक् मारली नी राजा झालों. ( तोंडांत मारून घेतो. ) पुन्हां मेलों तरी मी राजा होणार नाहीं. [ जातो.

---

## प्रवेश ६ वा

( **गंगातीर** : हरिश्चंद्र, तारामती, रोहिदास प्रवेश करितात. )

**हरि०**—

**मन हरिचरणिं आज रमलें ॥ अखिल पापहर सुखकर**
**गंगा-स्नान मजसिं घडलें ॥ प्रति कैलासासम ही नगरी ।**
**क्लेश विदारी श्रीमदनारी । सकल सुरगणासहित**
**शिवाला बघूनि श्रम मम हरले ॥ मन० ॥**

अहाहाहा ! पवित्र अशा गंगामातेचं स्नान झालं, जन्ममरणाच्या यातना चुकविणाऱ्या काशीविश्वेश्वराचं दर्शन घडलं, म्हणून माझ्या मनाला मोठा आनंद झाला आहे.

**विश्वा०**—( प्रवेश करून ) अरे, तुझ्यासारख्या भिकाऱ्याला भाकरीच्या तुकड्यांतहि आनंद वाटेल, पण माझ्या दक्षणेची काय वाट ? का तिचाहि आनंदच !

**हरि०**—महाराज, त्याच विचारांत मी आहें. अहो क्षेत्रस्थ जन हो,—

**सुजन हो दया करा दया करा । विनवी जोडूनी करा ॥**
**दोन भार मज हेम देउनी घ्यावें या किंकरा ॥ सुजन हो ॥**

**तारा०**—महाराज, आधीं या दासीचा विक्रय करावा, म्हणजे आपली विटंबना पाहण्याचं तरी माझ्या नशिबीं येणार नाहीं.

**हरि०**—लाडके, केवळ प्रेमानं वेडी होऊन तूं हें सहज बोललीस, पण प्राणाहून प्रिय अशा माणसांचा विक्रय करतांना माझ्या मनाची होणारी तळमळ तूं जाणली नाहींस ?

**विश्वा०**—तर मग, राजा, राज्यदान परत घेऊन आपल्या मनाची तळमळ तूं नाहींशी कां करीत नाहींस ?

**हरि०**—महाराज, राज्य गेल्याबद्दल मला बिलकूल वाईट वाटत नाहीं, तर केवळ माझ्या संसर्गानं या बिचाऱ्यांना यातना भोगाव्या लागत आहेत म्हणून मला वाईट वाटतं.

**विश्वा०**—अरे, पण राज्यदान परत घेतल्यानं, यांच्या यातना सहज नाहींशा होणार आहेत.

**हरि०**—नको–नको. पुन्हां पुन्हां ते शब्द ऐकायला पण नकोत. प्रिये, वत्सा, आपापलं मन घट्ट करून आलेल्या प्रसंगाला धीरानं तोंड द्या. नागरिक हो—

**एक भार मज हेम देउनी घ्या माझी प्रियकरा ॥ सुजन हो ॥**
**अर्ध भार मज हेम देउनी घ्यावें या लेकरा ॥ सुजन हो ॥**

[ नागरिक व एक नायकीण साजिंद्यासह प्रवेश करते.

**नायकीण**—कोण कुणाला विकत आहे ? मला पाहूं द्या. ( इतक्यांत शिष्याचा धक्का लागतो ) ए मेल्या लड्ढ्या, शिवलास ना ? फुटलं तुझं कपाळ तें. आतांच कीं रे मी गंगेवरून आंग धुऊन आलें. काशीविश्वेश्वरा, तुला डोळे आहेत रे बाबा !

**शिष्य**—अहो महासोवळ्या बाई, डोळे सर्वांना असतात, पण बारकाईनं पाहण्याची खुबी मात्र सर्वांच्या डोळ्यांत नसते. फार कशाला ? तुमच्याकडेच जर कुणीं निरखून पाहिलं, तर घरीं जाईपर्यंत, वाटेंत तुमचं सोवळं किती ठिकाणीं कितीजणांकडून विटाळलं जाईल, याची खात्री कोण देईल ?

**साजिंदा**—वाहवा ! रंगाजी, ये दिखनेमें तो अस्मानकी परी है, लेकिन लाचारीसे मरी है. कुछ फिकर नहीं. लेकीन माल तो उमदाहि है.

**शिष्य**—माल उमदा असेल, पण तुम्हांला जी उमेद पाहिजे ती हिच्यांत नसेल.

**नाय०**—एकदां आमच्या घरचं सुख पाहील, तेव्हां आपोआप उमेद येईल.

**साजिंदा**—हाँत्तो. बडेबडे अदर्मीके साथ दोस्ती हो जायगी.

**नाय०**—उंची उंची कपड्यांनीं नटायला मिळेल.

**साजिंदा**—जव्हेर गाहना पांवपर गिरेगा.

**नाय०**—काम ना धाम, राणीसारखी बसून राहील.

**साजिंदा**—और आनेजानेवालोंके उप्पर होकम बजानेकू मिलेगा.

**नाय०**—रात्रंदिवस सौख्यांत लोळेल. आमच्या घरच्या सुखाची यांना कल्पना नाहीं ?

**शिष्य**—तुमच्या घरच्या सुखाची ना ! यांपैकीं कोणालाहि कल्पना व्हायची नाहीं. पण गालफडं बसलेला हा तुमचा खप्पड चेहरा, काळवंडलेले ओंठ, खोल गेलेले डोळे यांच्याकडे पाह्यलं, म्हणजे आपण कितपत सुखांत असाल हें एखादं शेंबडंलेंबडं पोरहि सांगेल.

**साजिंदा**—क्या–क्या–क्या–पोर क्या शांगेल ? हमारे रंगाजीके यहां तो गांवके सब पोरे लोग आते है. हमारे रंगाजीके पांवका दर्सन लेनेके वास्ते बुड्ढे-बुड्ढेबि छोकरे बन जाते हैं. हमारे रंगाजीके वहां इतने जूत्ते गिरते है—

**शिष्य**—( स्वागत ) कीं या वस्तादजींना खातां–खातां खाववत नाहींत !

**नाय०**—खरंच ! एका नवऱ्याची ताबेदारी करण्यापेक्षां स्वतंत्रपणानें राहून आवडीच्या पुरुषाचा सहवास किती तरी सुखाचा असतो. फार तर काय पण आमच्याकडे येणाऱ्या लोचट पुरुषांना, कुत्र्याप्रमाणं युयू म्हणून बोलावतां येतं आणि हड्ड् म्हणून घालवतां येतं.

**शिष्य**—मग ते उनाड लोकसुद्धां कामापुरते मामा होत असतील.

**नाय०**—कां होईनात ? पण चालू घडी आनंदाची जाऊन हवी तशी चैन तर करायला मिळते ?

**शिष्य**—नरकांतल्या किड्यांची थोडी का चैन असते ? म्हणून त्यांच्या

आनंदाचा वांटेकरी जाणता मनुष्य थोडाच होणार आहे. आणि अहो महा-सोवळ्या बाईसाहेब, असलं निकामी अरसिक कूळ तुम्ही कशाला घेतां? मुलांपासून थेरड्यापर्यंत, घटिंगणापासून कुष्टरोग्यापर्यंत, सरसकट असणारा तुमचा रसिकपणा या बाईला थोडाच साधणार आहे?

**साजिंदा**—ये बात तो सच् है. हमारी रंगाजी तो बडी कसबवाली है.

**शिष्य**—तशीच रंगीबेरंगीहि पण आहे. रंग लावून रुपेरी केस लपविण्याची हातोटी, खोल गालावर लाली देण्याचं कसब, निस्तेज डोळ्यांत काजळ फांसून हरिणाक्षी होण्याची युक्ति, झुपकेदार नथीनं नकटं नाक झाकण्याची शिताफी, काळवंडलेले ओंठ लाल करण्याकरितां विड्याचा चाललेला खंथ, वाढतं वय चोरून ठेवण्याची शैली—आजोबा आले असतां आजी, नातू आले असतां नातसून होण्याची खुबी, वगैरे तुमच्या युक्त्या या बाईला जन्मांत साधायच्या आहेत?

**नाय०**—चल! चहाटळ मेला!

**विश्वा०**—तो चहाटळ असला तरी त्याची अटकळ खरी आहे, यांत काय तें उमजा; आणि आल्या वाटेनं परत जा झालं.

**तारा०**—नका हो, नका हो त्यांना घालवूं नका. या बाई मला विकत घेताहेत तर जाऊं द्या मला त्यांच्या बरोबर.

**विश्वा०**—पण तारामती, ही बाई जातीनं, वृत्तीनं आणि कृतीनं कोण आहे हें तूं ओळखलंस का?

**तारा०**—या कोणीहि कशाहि असोत, आपणाला द्यायच्या दक्षणेपैकीं थोडासा भाग जरी या देतील तरी त्या मला पूज्यच होतील.

**विश्वा०**—वेडी आहेस. अशा अविचारानं या कुलटेच्या संगतींत तूं एकदां भ्रष्ट ठरलीस, म्हणजे केवढंहि पुण्य जोडलंस, तरी शुद्ध होशील का?

**तारा०**—पण जी स्वभावतःच मनानं शुद्ध तिला निषिद्ध कोण करणार?

**विश्वा०**—दुसरं कोण! हिच्यासारख्याचा जरा सहवास घडला तरी दोषाला कारण होतं. 'संगतिः संगदोषेण सती-च-मतिविभ्रमात्' अग, ही बोलून चालून जारिणी.

**तारा०**—वाघिणी तर नव्हे ना? आणि वाघिणीला देखील प्रेमाने आपलीशी करून घेतां येते, मग या बाई तर मनुष्य आहेत. यांना माझी करुणा येणार नाहीं म्हणतां?

**विश्वा०**—प्रसंगीं वाघिणीच्या तोंडांत मानहि द्यावी, पण जारिणीच्या हातांत कान सुद्धां जाऊं देऊं नये, असं शास्त्रवचन आहे. म्हणून म्हणतों विषाची परीक्षा पाहूं नये हें बरें.

**तारा०**—पण महाराज, माझी पक्की खात्री आहे कीं, माझ्या पतीच्या चरण-कृपेनं, या विषाचं अमृतच होईल. इतकंच नव्हे तर–मी पतिचरणाची सेवा केली असेल, पती हेंच दैवत पूजलं असेल, पतीचीच मूर्ति हृदयांत सांठवली असेल, सारांश–पतिव्रता धर्म जर मजकडून यथाशास्त्र पाळला गेला असेल, तर जो कोणी मला विकत घेईल त्याचं मन शुद्ध होऊन, त्याच्या अंतःकरणांत माझ्याविषयीं करुणा येऊन माझ्या पातिव्रत्याचं रक्षण तो करीलच करील. म्हणून म्हणतें, हिच्याबरोबर जायला आपली आज्ञा असावी. हा पहा, कुलपति भगवान् सूर्यनारायण अस्ताला चालला.

**विश्वा०**—जा. मर जा. मीं तुझ्या कल्याणाची गोष्ट सांगितली, पण तुला मानवत नाहीं. नशीब तुझं. बुद्धी तर गेलीच आतां शुद्धीहि गमावशील झालं.

**तारा०**—( नायकिणीस ) बाई, आपण कोणीहि असा. मला आपण विकत घ्याच आणि आम्हांला ऋणमुक्त करा.

**नाय०**—काय भटजीमहाराज, या बाईला मी घेतें. काय हिचं मोल ठरविलं असेल तें मला सांगा पाहूं.

**विश्वा०**—हिच्या नवऱ्यानेंच नाहीं का मघां सांगितलं, कीं एक भार सुवर्ण म्हणून ?

**नाय०**—काय ? एक भार सुवर्ण ?

**सांजिदा**—क्या–क्या ? एक भार सुन्ना बोले तो क्यातना होता है ? मै तो बचपनसे इतना बुड्ढा बना, तुमारी घरकी और भारकी भी बहोत उलाढाल किये लेकिन् ए भार–मार क्या है सो आजतक सुनाभी नही.

**शिष्य**—बेट्याला साधं व्यवहारांतलं कोष्टक येईना आणि मोठमोठ्या घडामोडीच्या गोष्टी सांगतोय्. अहो वस्तादसाहेब दाढीवाले, तुम्हीं कधीं सोन्याचांदीची खरेदी विक्री केली आहे का ?

**सांजिदा**—हाँत्तो ! हमारे रंगाजीके अंगपर है, ओ सब सुन्नाचांदीके डाग मै बनाके दिया हूं.

**शिष्य**—देणारे निराळे शोकी, पण याची मधल्यामधेंच शेखी ! ( उघड ) तुम्हीं जर दागिने करवून दिले म्हणतां तर वजन करूनहि तुम्हींच घेतले असतील ?

**साजिंदा**—हाँत्तो ! तोले बिगर कैसा मोल हो जागया ! ये देखो, सुनो, आठ गुंजाका–मासा. बारा मासेका–तोला.

**शिष्य**—हं पुढं बोला.

**साजिंदा**—और चोवीस तोले का एक सेर. बस्स, इतनी हमारी अखेर.

**शिष्य—**तुमची अखेर जवळ आली खरीच. ( उघड ) अहो खानसाहेब, तुम्ही जो तोळा म्हणतां तशा चारशें तोळ्यांची एक तुला, आणि वीस तुलांचा एक भार. म्हणजे आठ हजार तोळे झाले. इतकं सोनं आहे का तुमच्यापाशीं ?

**नाय०**—काय हो वस्तादजी ? हे माझ्या अंगावरचे आणि घरांतले दागिने मिळून तेवढ्याची भरती होईल का ?

**साजिंदा—**हाँत्तो. घरमें जो कुच सटरफटर संदूकमें है, ओ बहोती बहोत होगा तो पांचसो तोले. और तुम्हारी पैठणी, दुपट्टा, साडी चोली, पलंग–गद्दी, लोडनिवास, पिकदान–पाकदान, भांडा–कुंडा, घरदार सब बेच दिया तो जरूर जरूर सो आढाईसो तोले.बस दोनो मिलके होजायगी सात आठसों तोलेकी भरती.

**नाय०**—जळली तुमची गणती. अहो, हे मागताहेत आठ हजार तोळे; त्याचं काय करावं !

**शिष्य**—घरदार विकावं आणि या बयेबरोबर भीक मागत फिरावं.

**नाय०**—चल फाजील मेला. वस्तादजी चला घरीं. ही बाई कांहीं आपल्या उपयोगाची नाहीं आहे. ही रडतलक्ष्मी घोड्यावर बसणार काय आणि तीर मारणार काय ?

**साजिंदा**—हाँत्तो, हमतो अव्वलहि बोलेथे. [ जातात.

**शिष्य**—संभाळून जा हो. नाहीं तर विटाळ होईल.

**काल०**—( कालकौशिक येतो. ) नमोनमः । आपणच का गुलामगिरीचा व्यापार काढला आहे ? आम्हांला एक बाई हवी आहे.

**विश्वा०**—पण, आपण तपस्वी असून बाईचीशी चौकशी करतां ?

**काल०**—तपस्वीच जर माणसांचा व्यापार करूं लागले, तर मग त्यांना मान देण्याकरतां, तपस्व्यांनींच गिऱ्हाईक झालं पाहिजे. अहो, ब्रह्मकर्म सुरळीतपणें करतां यावं, म्हणून गृहकृत्य संभाळण्यासाठीं मला एक बाई हवी आहे. मी

जरी तिला विकत घेतों आहें, तरी तिचा मी मुलीप्रमाणंच संभाळ करीन. सांगा बरं, हिची काय किंमत आहे ?

**हरि०**—महाराज, एक भार सुवर्ण देऊन हिला घेऊन जावं. ( कालकौशिक सुवर्ण देतो. ) तारामती, या निष्ठुर पतीची शेवटची आज्ञा मान्य करून यांच्या बरोबर जा. आतां भेटीची आशा नाहींच, पण भगवंताची कृपा असल्यास कदाचित् तुझं दर्शन होण्याचा संभव आहे.

**तारा०**—हाय ! हाय ! आतां माझी गति काय होणार ?

**फिरली दैवगती या नियतीं श्रीपती काय ॥ परकें दास्य अडे जें योग्य न हाय ॥ धाय ! हा बलहीन साहूं मी कशी ॥ मरण कां तें येईना मशीं ॥**

महाराज, तुम्ही तरी कृपा करा आणि आम्हां त्रिवर्गांना आपणच विकत घ्या. आम्हीं आपल्याला रोज धन्यवाद देऊं.

**काल०**—बाई, मीं ब्राह्मण निष्कांचन. घरांत आहे नाहीं तें देऊन मी तुला विकत घेणार, मग तुम्हां सर्वांना विकत घ्यायला मी द्रव्य कुठून आणूं ? तुझी मर्जी नसेल तर तूं नको येऊं.

**विश्वा०**—बस्स ! हरिश्चंद्रा, मला तुझी दक्षणा नको. अरे, बायकोचं ऐकून प्रत्येक गिऱ्हाईक जर परत पाठवूं लागलास, तर मी इथं तोंडाकडे पाहात तिष्ठत उभा राहूं कुठपर्यंत ? बोल, मला दक्षणा द्यायचं सामर्थ्य नाहीं असं म्हण, कीं हा मी चाललों.

**हरि०**—महाराज, कृपा करून जरा थांबा. तारामती, मीं वचनभ्रष्ट होऊन माझी सर्वत्र अपकीर्ति व्हावी अशी का तुझी इच्छा आहे ? तूं क्षत्रियाची कन्या, क्षत्रियाची स्त्री, क्षत्रियाची माता; तूं धैर्य सोडणं चांगलं नव्हे. दुःखाचा कडेलोट झाला तरी क्षत्रियांचीं मनं आणि शरीरं तें सर्व सोसायला तयार असतात; हें तूं जगाला दाखिवलं पाहिजे. थोडीशी पुण्याई उभी राहिली, म्हणून तुला या सत्पुरुषाचा आश्रय मिळत आहे, याचा अव्हेर केलास तर न जाणो, कदाचित् नीच मनुष्याची हीन सेवा करावी लागेल. म्हणून म्हणतों, या ब्राह्मणश्रेष्ठाबरोबर जा; आणि ईश्वराचं चिंतन करीत त्यांची सेवा कर. तोच तुझा त्राता. सोड आतां मला. तूंच जर धीर सोडलास तर त्या पोरानं काय करावं बरं ? तो पहा, कसा

दीनवाण्यासारखा उभा आहे. त्याला पोटाशीं धर, त्याचं समाधान कर, त्याला धीर दे आणि मग जा.

**तारा०**—बाळा, मी तुला अगदींच विसरलें कीं रे ! ये रे ये, लाडक्या, मला तुझी अखेरची भेट घेऊं दे. ( भेटतात ) बाळा, ही तुझी निर्दय आई–नव्हे–नव्हे चांडाळीण, परक्याची दासी झाल्यामुळं तुला टाकून चालली बरं.

**रोहि०**—पण आई, माझी काय वाट लावतेस ? लळा लावलेल्या बाळाचा गळा तूं कोणाच्या ग हातीं देणार ? आजपर्यंत माझे लाड पुरविलेस ते मला असा पोरका करून जाण्यासाठींच का ग ? आई, मला टाकून तुझ्यानं कसं ग जाववेल ! लहान मुलाला टाकून जाण्याइतकी आई निर्दय असते का ग ? तुझे मायेचे अश्रू मला धीर देऊन सांगतात, कीं तूं मला पोरका करून जाणार नाहींस. आई, जाशील का ग ? जाशील का ग ? नाहीं म्हणून म्हण.

**विश्वा०**—अरे पोरा, पुरें कर तुझें पुराण. सोड तिला. उगाच माझा खोळंबा करूं नकोस.

**तारा०**—हाय हाय ! आतां मात्र दुःखाचा कहर झाला. बाळ, तुझ्यावरची माया मला अडवून धरते; माझीं पावलं जड करते; छाती, कंठ दाटून आणते ! अशा वेळीं, माझ्या लाडक्याची मिठी मला कशी सुटेल ? याचे शब्द माझ्या काळजाला झोंबतात, वाणी कुंठित करतात, डोळ्यांवाटे अश्रुधारा वाहवितात. आतां काय करूं ? महाराजांचं सत्त्व राखूं कीं आईपणा टाकून माझ्या बाळाला दूर लोटूं ? काय, करूं तरी काय ?

**रोहि०**—तर मग आई, कांहीं एक न बोलतां तूं मला पोटाशीं धर. तुझा मायेचा हात माझ्या अंगावरून फिरीव. ममतेनं वहाणाऱ्या अश्रूंचा मला अभिषेक कर. अशा स्थितींत मी जन्मभर सुखानं राहीन. मला वैभव नको. आई, तुझा बाळ असाच लहान राहूं दे.

**विश्वा०**—तर मग कारट्या, असाच तडफडत रहा. चल हो दूर.

**रोहि०**—आई, मी आतां असाच दूर राहूं का ग ? तूं मला नाहीं जवळ घेत ! मला खरोखरच उघडा टाकून तूं जाणार का ग ?

**तारा०**—नाहीं बरं बाळ, तुला टाकून मी कधींहि जाणार नाहीं. सिंह-वाघाची भीति न धरतां आपलं चुकलेलं पाडस शोधायला, गरीब जनावरं रानावनांत वणवण फिरतात; पक्ष्यांचं पिल्लूं चुकलं तर तें प्राण जाईपर्यंत टाहो

फोडतात. मग मी मनुष्य, पोटाशीं धरलेलं मूल कशी टाकूं ? बाळ, तूं इतक्या लौकर कशाला बरं जन्म घेतलास ? तुझा भार अजूनहि मीं सहन केला असता. महाराज, आम्हां माय–लेकरांची तरी ताटातूट करूं नका; दया करा, आणि आम्हां दोघांना एके ठिकाणीं तरी विका.

**हरि०**—पण, या चांडाळाच्या हातीं आतां काय उरलं आहे ? तारामति, वत्सा रोहिदासा, हा तुमचा दुसरा जन्म समजा. माझ्या पातकामुळं तुम्हांला हीन स्थितींत जन्म आला, म्हणून मला शिव्या द्या. भयंकर शापांची वृष्टी करा. भगवंता, माझ्या पातकाबद्दल तूं मला नीच योनींत अनंत जन्म दे. असंख्य युगापर्यंत रौरवनर्कात बुचकळत ठेव. पण या निरपराधी प्राण्यांवर दया कर.

**तारा०**—महाराज, नका हो असं बोलूं. अशानं मी आपल्या पायांपाशीं जीव देईन. आणि जन्मोजन्म आपलीच दासी होईन. ( कालकौशिकाला ) द्विजराज, तुम्ही तरी या बाळाला दोन गोष्टी सांगून बाजूला करा हो !

**काल०**—बाई, आईपासून मुलाला दूर करण्याचं सामर्थ्य माझ्या आंगीं नाहीं. पाषाणहृदयाचाच मनुष्य तें काम करील. तुमच्याकडे पाहून मला फार दया येते, पण आम्हां गरीब ब्राह्मणाच्या दयेचा उपयोग काय ?

**तारा०**—दया करून माझ्या बाळाला तुम्हीच विकत घ्या. नवरा–बायको, माय–लेकरूं यांची भेट केल्यानं मोठं पुण्य लागतं. तर तेवढं पुण्य पदरीं घेऊन निदान आम्हां मायलेकरांची तरी ताटातूट करूं नका. मी आपल्या पायां पडतें–पदर पसरतें. एवढी भिक्षा घालाच आम्हांला.

**काल०**—ठीक आहे. या तुझ्या मुलालाहि मी विकत घेतों. काय रे बाबा, या मुलाची काय किंमत आहे ?

**हरि०**—अर्धभार सुवर्ण ! पृथ्वीदान करून सुद्धां गुणवान् पुत्ररत्न मिळत नाहीं. पण मी आज तें माती मोलानं विकतों आहें.

**काल०**—देवाची मर्जी ! अहो, मी अर्धभार सुवर्ण पाठवून देतों. बाई, चल आतां मुलाला घेऊन. आतां रडूं नकोस हो.

**हरि०**—तारामति, रोहिदासा, या सत्पुरुषाबरोबर जा. परमेश्वराच्या कृपाछत्राखालीं मी तुम्हांला सोंपवितों. तोच तुमचं रक्षण करो.

**रोहि०**—महाराज, मी आणि आई जाऊं म्हणतां ? पण तुम्ही कुठं जाणार ?

तुम्ही आम्हांला कुठं भेटाल ? तुम्हांला आम्हीं कुठं पाहूं ? महाराज, आम्ही रडतों म्हणून तुम्हीं आम्हांला कंटाळला का हो ?

**हरि०**—बाळ, आपलं दैवच कंटाळलं आहे. जा आतां. आपल्या आईला जप, तिच्या आज्ञेंत वाग, तिला दुखवूं नकोस. माझी आठवण काढून रडूं लागली तर तिचं समाधान कर. मातृभक्त मुलावर भगवंताची कृपा असते. तारामति, जा याला घेऊन. हें काय बरं ? किती रडशील ? तुझ्या कृतीनं माझ्या यातना मात्र वाढत आहेत. तर सोडा मला. माझ्या रोहिदासाला नीट सांभाळ. सूर्यकुलाचा हा एवढाच अंकुर आहे. त्याची नीट जोपासना कर. पुढं भगवंताला आवडेल तसं तो करील. जा आतां.

**तारा०**—जातें मी. नाहीं मी आपल्या यातना वाढवीत. येतें बरं. पण, पुन्हां आपली भेट—

**हरि०**—कर्मभोग संपला तर भेटूं आपण.

**तारा०—देवा राखी सुखी प्राणनाथा रे ॥ मुखचंद्रा कधीं पाहुं**
**आतां बरें ॥ सुखवूं प्रिय पती करें ॥ आस ना उरे ॥**

**हरि०—प्राणचि केवळ तुम्ही खरे विकिन सुखें कधिं काय ॥**
**जाई वत्सासह सती मानुनिया निरुपाया ॥**

**तारा०—जड होती चरण ना उचलती खरे ॥**

**हरि०—तुझ्या दुःखें सती शोक मज नावरे ॥**

**तारा०—परसेवेंत कशि चित्त रमवूं बरें ॥**

**हरि०—दैव गे फिरे ॥**

**हरि०**—( तारामति, रोहिदास गेल्यावर ) झालं, सर्वस्वाची वाट लावून, मी आतां निःसंग बनलों. आतां माझं कांहींहि होवो.

**डोंब**—( प्रवेश करितो ) अर कोन हाय तिकडं; व्हा पलीकडं, व्हा पलीकडं. इंटाळ व्हईल, इंटाळ व्हईल.

**शिष्य**—घ्या. मघां ती विटाळवाली सौभाग्यवती येऊन गेली आणि आतां हा इंटाळवाला महाब्राह्मण आला. इतरांना आपलं सोवळं स्वतःच जपावं लागतं, पण या बेट्याच्या सोवळ्याला लोकांनीं जपलं पाहिजे ! महाब्राह्मणा, तुला काय पाहिजे ?

**डोंब**—अर बामन कशापायीं म्हनतुयास ? मिरासदार इरबाहु डोंब म्हन की. इतं मानुस कोन इकतोया ? मला योक मानुस इकत घेयाचा हाई.

**शिष्य**—काय ? तूं माणूस विकत घेणार ? ठीक. आमच्या काळ्या कुत्र्यानं इत्ती विकत घेण्यासारखंच सांगतो आहेस हें.

**डोंब**—कां रं ल्योका, तूं आपल्या परमानं मलाबि भिकारडा समजतुयास व्हय ! आर बिट्या, ह्येला तर घेईनच घेईन, पण तुला, आन या मानुसइक्या बामनालाबि इकत घेइन; इतकी ताकत माझ्यामंदी हाय. सांग र मानुसइक्या बामना, याचं मोल काय ?

**विश्वा०**—हॅं. हॅं. हॅं. अरे मूर्खा, जरा दुरून बोल. विटाळ होईल ना !

**डोंब**—इचिभन काय न्याव बगा ? ह्यो मानुस, मी मानुस, आन मानसाचा मानसालाच इंटाळ होईल म्हनं ? अव बामनबुवा—

**कुठून आला बामन सांगा, करतों जोहार ॥**
**समदं झालं तवां जगामदिं नव्हता का म्हार ॥**
**हलकं करतों काम म्हनुन काय अम्हीं हीन सारं ॥**
**मानुस इतकां यास कुठं हाय सास्तरिं आधार ॥**
**मास हाडकं रगत असा ह्यो शरीर-बाजार ॥**
**तुमच्या अंगीं दूद असल तर काढुन द्या धार ॥**
**म्हारा घरचं तुम्हांस खपतं सोनं जवाहीर ॥**
**भाकर कपडा नगं म्हंगता न्याव नव्हं व्हार ॥**

**विश्वा०**—अरे अकलेच्या खंदका, तूं मला वेदान्त शिकवायला आला आहेस का माणूस विकत घ्यायला आला आहेस ? फाजिलपणा न करतां दोन भार सुवर्ण इथं ठेव, आणि याला घेऊन जा. नाहीं तर आलास तसा चालता हो.

**डोंब**—इकतंच ? थुः तिचिभन. अर ल्योका, घा इस भार सोनं देऊनशान ह्येला इकत घीन इकतं माझं सामरथ हाय. ह्ये घे दोन भार सोनं. आतां चल रं मानसा माज्यासंगं.

**विश्वा०**—हरिश्चंद्रा, आतां याच्याबरोबर खुशाल जा, मी सर्व दक्षणा भरून पावलों. तूं आतां ऋणमुक्त आहेस.

**हरि०**—दक्षणेकरतां आपल्याला फार' कष्ट पडले याबद्दल क्षमा असावी. द्विजराज, असाच कृपालोभ ठेवावा.

**विश्वा०**—अस्साच ठेवीन. जा आतां. ( स्वगत ) सध्यां तर तूं आपलं सत्त्व राखलंस खरं. पण मी अजून नाउमेद झालों नाहीं. यापुढं छळाची शिकस्त करीन, आपली सर्व तपश्चर्या खर्ची घालीन, पण तुला सत्त्वभ्रष्ट करीनच करीन.

**डोंब**—अरे ए चाकुरा, मला मुजरा करून हो कीं म्होरं, अन् घरीं गेल्यावर माज्या कारभारनीला मुजरा कर–इसरूं नगस गाडीच्या.

**हरि०**—आज्ञा धनीसाहेब. ( स्वगत ) भगवंता सूर्यनारायणा, तुझ्या वंशजाची काळजी तुलाच असूं दे. मी सर्वसुखभ्रष्ट झालों, पण सत्त्वभ्रष्ट झालों नाहीं, याचा अभिमान धरून पुढंहि मी सत्त्वभ्रष्ट होणार नाहीं, अशी सद्‌बुद्धि मला दे. तुला माझा प्रणाम असो—

**रविकुलभूषण भास्करा ॥ वंशांकुरा या रक्षुनीया दे थारा ॥ दास्यीं पराच्या ताता । कैसें पूजूं मी आतां ॥ माथाच हा घे मानी करभारा ॥ रविकुलभूषण० ॥ नेत्राश्रूंचीं हीं अर्घ्यें । वाही पदासीं बा घे ॥ पापांध मी त्या वारी अघभारा ॥ रविकुलभूषण० ॥**

---

# अंक तिसरा



## प्रवेश १ ला

( **डोंबाचें घर.** पात्रें—हरिश्चंद्र, डोंब, डोंबीण वगैरे. )

**डोंब**—( हरिश्चंद्रास ) आर ए चाकुरा, इतं उभा -हा. मी हाक मारीन तवां म्होर ये बरं का. अग ए, कारभारनी-कारभारनी !

**म्हशा**—( पुढं येऊन ) काय-काय म्हंगता जी धनीसाब ?

**डोंब**—तूं का माझी कारभारीन व्हय ? हात गाढीच्या—बायल्या !

**म्हशा**—( ओशाळून ) घसारलं घसारलं—इन्चिभन !

**डोंब**—अग ए, कारभारनी-कारभारनी !

**डोंबीण**—( पुढें येऊन ) जी-जी-जी. इक्ती तहान भुक लागलीया कशाची ?

**म्हशा**—चापटपोळ्या खायची.

**डोंब**—तूं लई दिसापुन हंगत होतीस का एका चाकुरानं माझं भागत न्हाई, तवा ह्यो दुसरा चाकुर आनलाया तुझं काम भागवाया.

**डोंबीण**—कोन ? ह्यो चाकूर ? ह्यो तर अक्षी राजबिंड्यावानी दिसतुंया ? ह्यो मेला माझं कनचं काम करणार ? का रं चाकुरा, करशील का समदं घरकाम ?

**हरि०**—होय स्वामिनी, तुम्हीं सांगाल तें काम मी मन लावून विश्वासानं करीन.

**डोंबीण**—आन जर काई चुकलाबिकलास, तर मंग माझ्यासंगं गांठ हाय बघ—माझ्यासंगं.

**म्हशा**—होय रे बाबा ! या बयावानी मंग दुवाड न्हाई कुनी.अक्षी इडळीवानी तुझ्या बोकांडींच बसल.

**डोंबीण**—अर मेल्या माजुऱ्या, तर मंग त्येच्या बोकांडीं बसन तवां बसन पन अदुगर तुझ्याच बोकांडीं बसतें.

[ मारते.

**डोंब**—अग पन-अग पन, अशी पिसाळल्या कुत्रीवानी को करतियास ? सांग स्योला कंचं काम सांगतियास तें सांग.

**डोंबीण**—पण काय रं चाकुरा, तुझं नांव रं काय ?

**हरि०**—स्वामिनी, मला हरिश्चंद्र म्हणतात.

**डोंबीण**—काय ? हरिचा उंदर ! कनच्या हरिचा उंदर !

**डोंब**—अग, जरा सुद बोल-सुद बोल ! हरिचा उंदर नव्ह, हिडिसचंदर.

**हरि०**—नाहीं स्वामी, हरिश्चंद्र.

**डोंबीण**—काय, हरिचीचुंदर ! लई बिकट नांव. मी आपली हन्याच म्हंगत जाईन.

**डोंब**—अन्, म्या बी म्होरलं चंद्या म्हंगत जाईन.

**डोंबीण**—आर ए हन्या, ती नवी घागर घेऊनशेनी त्यो रांजन पान्यानं भरून ठेव बरं का.

**डोंब**—अग त्यो करील समदं. लई हुशार हाय. आतां चलकी घरामंदी. आन—

**राजारानी बसं पलंगीं आपुन दोघंबी संगती ॥**
**रंगामंदिं दंग राहुं या नोकर चाकर घरिं खपती ॥**
**तूं चांदनी ग ॥**

**डोंबीण—चांदोबा तुम्ही असा ॥**

**दोघे—रंगेल जोडा दिसे कसा ॥ जनु अलबेला खुले जसा ॥**

[ जातात.

**हरि०**—( घागर खांद्यावर घेऊन ) शिव, शिव, शिव ! अरे निर्दया दैवा ! तुझी तरी इच्छा पुरी होऊं दे. आजपर्यंत ज्या हातांत राजदंड धरला, त्या हातांत आज हें दीड दमडीचं मडकं यावं अँ ? धिक् धिक् माझं जिणं ! ( पाण्याला जाऊं लागतो तोंच विश्वामित्र घागर फोडतो. ) अरे, अरे, अरे ! हें मडकं फुटलं नव्हे तर केवळ माझं दैवच फुटलं !

**डोंबीण**—( धांवत येते. ) अग बया बया बया ! अर ए मेल्या हऱ्या, मेल्या तुझं मढं गेलं त्यें ! नवी कोरी घागर फोडूनशान टाकलीस ना ? मेल्या, मुडद्या, आतां पानी का तुझ्या डोंबलानं भरायचं व्हय ? बोल की बिगी बिगी, बोल की बिगी बिगी !

[ मारते.

**हरि०**—स्वामिनी, क्षमा करा. मडकं वापरण्याचा तर काय, पण तें पाहण्याचाहि सराव नसल्यामुळें माझ्या हातून चूक झाली. तुम्ही थोर माझी धनीण—मातोश्रीसमान, तेव्हां लेकराला क्षमा करा, क्षमा करा.

**डोंबीण**—खेमा करा खेमा करा. बोलतोय कसा भराभरा! पन असं कशापायीं ? न्हावदे आतां पानी ! त्यें दळण दळ बघूं. अगदीं बारीक बारीक दळ बरं का ? जर का भरडा बिरडा काढलास तर, मेल्या मुडदाडा, तुझ्या हाडांचा खुळखुळाच करीन.

[ जाते.

**हरि०**—( दळतांना ) हर हर दैवा ! तुझी गतीहि या जात्याप्रमाणंच चक्राकार आहे यांत शंका नाहीं. दुष्टांना चिरडण्याकरतां ज्यानं आपल्या हातीं आजपर्यंत शस्त्र धरलं, त्यानं—त्याच हातानं धान्य दळण्याचं बायकी काम करावं अँ ! धिःकार असो या जिण्याला !

[ जात्यावर डोकं ठेवून बसतो, तोंच डोंबीण येते.

**डोंबीण**—का रं हऱ्या, आर मेल्या झोप घेतुंयास का दळतुंयास ? जळलं तुझं थोबाड त्यें ! वाह्ळ झाला तरी अजून पसाभरबी पिट पडलं न्हाई ? आतां तुझे वडील गिळाया येत्याल, तवा तुला भाजून तळून त्यांच्या म्होरं वाढूं का माझे हात पाय तोडून वाढूं ! म्हशा—म्हसोबा—अर ए मेल्या म्हशीच्या बा ! तकडलं मुसळ आन. या मेल्याचं कंबरडं मोडत्यें, आन याला दळायला शिकवतें. ( त्याला मारीत ) दळतां येत न्हाई. गिळतां येतं.

**डोंब**—( प्रवेश करतो ) अग पन थांब. ह्यो हाय तरी काय गोंधळ ?

**डोंबीण** —ह्यें हाय या मेल्याचं मढं, माझं रडं, आन आलंया तुम्हांकबं. आतां या बगुं फुडं, का मीच येऊं तिकडं ?

**डोंब**—नको. हाईस तथंच बेस हाइस बया. पन मी असं इचारतों, कां तूं ह्येला मारतीस ? कशापायीं ?

**डोंबीण**—मेल्यानं माझ्या संसाराचं वाटुळं केलंया. आन् तुमचा जळला म्होरा त्यो, दोन भार सोनं देऊनशान असा पांढऱ्या पायाचा चाकुर आनतांना तुमचा मुडदा कसा गेला न्हाई !

**डोंब**—का र चंद्या, गुलामा, तुझ्यापायीं जिवंतपनींच माझा मुडदा चाल्लाया, ह्यें दिसतं का न्हाई तुला !

**हरि०**—स्वामी, संवय नसल्यामुळं कामांत चुका होतात त्याबद्दल क्षमा करा.

**डोंब**—तर मंग असं कर. अग ए, ह्यो चाकुर जर तुज्या मनापरमानं तुझं काम उरकीत न्हाई, तर ह्येला न्हेतों मी माझ्यासंगं मसनांत. आर ए हऱ्या, तूं आजपुन मसनवटांत पारा कर. आन मुडदा आला, का त्येचा आंगावरचं पांघरून आन मुड्यामागं सव्वा रुपया घेऊनशानी मुडदा जाळाया दे. चल तर आतां माझ्यासंगं मसनांत—चल. आन ए कारभारनी, तुझं काम उरकाया ह्यो हाईच म्हशा. मग तर होशील का न्हाई खुस. त्यो तुझं समदं काम मनापरमानं करील आन् तूं —

**बस घरीं अक्सीं नट्टुनि थट्टुनी ॥ खुलुं दे तुझीबि भरज्वानी ॥**

**डोंबीण**—

**चल भरला गेली बुध शानीं ॥ बरळतसा कां येड्यावानीं ॥**

**डोंब**—

**लई ग्वाड सुबद् ये कानीं ॥ काळजाचं करशी पानी ॥**
**मी राजा तूं तशि रानी ॥ सुख भोगिन राजावानी ॥**

**डोंबीण**—

**ह्यो मुखडा घुबडावानी ॥ कोन अशास राजा मानी ॥**
**म्हनं उतून चालली ज्वानी ॥ पन करनी माकडावानी ॥**

---

## प्रवेश २ रा

( **तपोवान**— रोहिदास इतर शिष्यांबरोबर येतो. )

**१ शिष्य**—चला. दर्भसमिधांच्या निमित्तानं कांहीं वेळ मोकळीक मिळाली हें भाग्यच म्हणायचं. हे गुरुजी—गुरुजी कसले ? काळच हे. अहो, घटकाभर मोकळे सोडित नाहींत किंवा विश्रांति घेऊं देत नाहींत.

२ शिष्य—खरंच बुवा! कंटाळा आला या घोकंपट्टीचा. अभ्यास नको म्हणून घरांतून पळालों आणि इथं येऊन राहिलों. म्हटलं, चमचमीत जेवायला मिळेल आणि हवी तशी चैन करतां येईल. पण इथं तर पाठीशीं आपला 'सहस्रशीर्षांचा' पुरुषच लागला आहे.

३ शिष्य—होय रे बाबा! मीसुद्धां आईबापांच्या धाकामुळं घरांत कांहीं मनसोक्त वागतां येईना, रात्रीचं कुठं बाहेर पडतां येईना म्हणून इथं आलों; पण इथं पहातों तर घरच्यापेक्षां अधिक सक्तमजुरी! तें पुरुषसूक्त—

१ शिष्य—अरे जळो तें पुरुषसूक्त! माझ्या तोंडीं तर त्यांतले अवघड शब्द बसतां बसत नाहींत, आणि गुरुजी तर तें घशांत कोंबल्याशिवाय राहात नाहींत.

४ शिष्य—तर मग मूर्खांच्या कांद्या, त्याबद्दल गुरुजींचे आभार मानायचे सोडून उलट त्यांची चेष्टा करतोस, हा कुठचा शहाणपणा?

२ शिष्य—घ्या! हे मोठे लेकाचे गुरुभक्त आले.

४ शिष्य—तुम्हीं कांहीं म्हणा, पण गुरुजी काळजीपूर्वक जें शिकवितात—

३ शिष्य—काळजीपूर्वक? काळजीपूर्वक तर नाहींच, पण काळीज खाऊन मात्र शिकवितात.

४ शिष्य—अरे, अरे! मूर्खांनो, ज्या विद्येवर तुमचं जीवित्व अवलंबून त्या विद्यादेवीची निंदा करितां?

१ शिष्य—बरं बरं. आम्हांला काय वाटेल तें आम्ही करूं. आपल्यासारख्या चोमड्यांची मधें वकिली नको आहे.

रोहि०—कमलाकरा, यांचं हें गुऱ्हाळ संपायचं नाहीं; चल, आपण त्या सरोवरांतलीं सुंदर कमळं तोडूं.

४ शिष्य—वेडा आहेस! त्या सरोवराच्या कांठीं भयंकर सर्प आहेत म्हणे!

रोहि०—असूं देत रे. शिवपूजेकरतां जर गुरुजींना कमळं उपयोगी पडलीं तर गुरुजींना मोठा आनंद होईल.

२ शिष्य—अहो गुरुभक्त शिष्य, आणखी आपण सर्प चावून तिथं मेलांत तर!

रोहि—फारच उत्तम. देवपूजेकरतां कमळं तोडीत असतां जर मला मृत्यु आला, तर माझ्यासारखा भाग्यवान् त्रिभुवनांत कोणीच नाहीं असं मी समजेन. तूं घाबरूं नकोस रे. हा मी आतां कमळं तोडून आणतों. [ जातो.

**४ शिष्य**—छेः ! त्याला एकटा सोडणं बरं नव्हे. [ जातो.

**१ शिष्य**—बरी पिडा गेली. आतां तुम्हांला, मी आपला गुप्त बेत सांगतों. गुरुजींचा आणि अभ्यासाचा त्रास चुकवण्याकरतां मी उद्यांपासून असं पोटांत दुखायचं सोंग करतों, कीं आईच्या, बापाच्या आणि देवाच्या नांवानं बोंबलून बोंबलून सारा आश्रम डोक्यावर घेतों.

**२ शिष्य**—गुरुजी वैद्यबुवांना बोलावतील. मग ?

**१ शिष्य**—अरे, सगळ्या वैद्यांचा काढा करून जरी मला पाजला, तरी माझं पोटांत दुखणं थांबायचंच नाहीं.

**२ शिष्य**—आहे खरी बुवा युक्ती ! मीहि माझ्या मामाच्या नांवाचं एक बनावट पत्र तयार करतों आणि त्यांत लिहितों, कीं तुझी आजी मरायला टेकली असून घोंगडीवर काढली आहे, तेव्हां जेवीत असलास तर हात धुवायला इकडे ये; तरच दृष्टिभेट होईल ! कीं झालोंच आम्ही मोकळे.

**३ शिष्य**—खरंच गड्या. तर मग मीसुद्धां दिवाणजींना पत्र लिहितों, कीं आमचे वडील वारल्याबद्दल पत्र लिहा म्हणून. अर्थात्, मालमत्ता ताब्यांत घेण्याकरतां मला एकदम गेलंच पाहिजे.

**१ शिष्य**—अरे वा ! तर मग आपण सगळे एकाच माळेचे मणी. पण यांत मेरूमणी रे कोण ?

**४ शिष्य**—( धांवत येतो. ) मेरूमणी तुमचा बाप ? मूर्खांनो, गप्पा मारीत काय बसलांत ? तो रोहिदास तिकडे सर्पदंशानं मेला ना !

**१ शिष्य**—मेला ? ठार मेला ? असा कसा मेला बुवा ?

**२ शिष्य**—मीं मुळीं भविष्यच केलं होतं, कीं तो मरेल म्हणून.

**३ शिष्य**—बरोबरच आहे. माणसानं केव्हांतरी मेलंच पाहिजे.

**४ शिष्य**—अरे मूर्खांच्या कांद्यांनो ! त्याच्या आईला ही गोष्ट कळवायची सोडून, निर्लज्जासारखे त्याच्या मरणावर कोट्या करीत काय बसलां ? चला-चला-त्याच्या आईला ही बातमी कळवूं चला. [ जातो.

**१ शिष्य**—( जातां जातां ) काय रे गड्यांनो, रोहिदास तर मेला, आतां त्याच्या आईला काय सांगायचं ?

**२ शिष्य**—तें मी सांगतों. त्याच्या आईला–त्याच्या आईला सांगूं, कीं आम्हीं नाहीं म्हटलं, त्यानं होय म्हटलं. आम्हीं नको म्हटलं, त्यानं जातों म्हटलं. आम्हीं त्याला धरलं, पण त्यानं आम्हांला मारलं—

**३ शिष्य**—शेवटीं गेला आणि मेला.

**१ शिष्य**—बस्स, बस्स, छान युक्ती. असंच सांगूं.

**२ शिष्य**—चला तर. इथूनच रडत जाऊं.

**१ शिष्य**—पण रडण्याचा आवाज गुजराथी तऱ्हेचा काढा हैं.

[ जातात.

---

## प्रवेश ३ रा

( **स्थळ–तपोवन**–तारामती, विश्वामित्र व शिष्य वगैरे. )

**तारा०**—दुःख! दुःख मेलं सोसावं तरी किती? आतां दुःखाचं शिखर झालं. आमच्यावर किनई सारं–सारं जग उलटलं आहे. बरं बाबांनो, तुमचं कल्याण होऊं द्या. कुणी हांक मारली? माझा बाळ आला वाटतं? पण मला कुठं दिसत नाहीं तो?

**४ शिष्य**—काकू, आतां तुमचा बाळ येणार कुठून? तो तुम्हांला सोडून केव्हांच गेला?

**तारा०**—काय म्हटलं? माझा बाळ गेला? केव्हां? कधीं? कुठं? आतां मात्र माझे हातपाय मोडले रे देवा! (प्रेतावर पडते.) अगबाई? हें काल्यासारखं गार गार काय लागलं? प्रेत? आणि तेंहि माझ्या बाळाचं? हाय रे दुर्दैवा! माझ्या बाळाचा प्राण कुणीं रे घेतला?

**विश्वा०**—( ब्राह्मणाच्या वेषानं येतो ) तर मग प्राण हरण करणाराला तूं शाप दे.

**तारा०**—काय? शाप देऊं? आणि तो कुणाला?

**विश्वा०**—मला. कारण तुझा मुलगा मीं मारला.

**तारा०**—अगबाई! आपण पवित्र ब्राह्मण,–माझ्या बाळाचा प्राण आपण कशाला घ्याल? थोर माणसं कुणालाच छळीत नसतात.

**विश्वा०**—बरं पण बाई, तूं आहेस तरी कोण ?

**तारा०**—मी कालकौशिकाची बटकी तारामति.

**विश्वा०**—अरे अरे अरे अरे ! तर मग कुमार रोहिदास कुठं आहे ?

**तारा०**—हा पहा. त्याला इथं झोप लागली आहे.

**विश्वा०**—का काळझोप लागली आहे ! तारामति, तुला वेड तर नाहीं लागलं ! अग, हें तर प्रेत आहे.

**तारा०**—नका हो असं बोलूं. महाराज पुढें मला भेटले, आणि माझा आवडता रोहिदास कुठं आहे म्हणून विचारलं, तर मीं काय बरं उत्तर देऊं ?

**विश्वा०**—जिथून आला तिथं गेला असं सांग म्हणजे झालं.

**तारा०**—नाहीं हो ! ही तिकडची ठेव होती. मला म्हणतील, कीं तूं होऊन माझी ठेव हरवलीस ! त्यांना काय सांगूं ? कोणतं उत्तर देऊं ग बाई !

**विश्वा०**—तारामति, धर्मज्ञ राजा हरिश्चंद्राची तूं धर्मपत्नी, मग हा अधर्म काय करतेस ? भूमीवर फार वेळ प्रेत ठेवून तिला भार देणं योग्य नव्हे.

**तारा०**—मग मी आतां काय करूं म्हणतां !

**विश्वा०**—तूं कांहीं करूं नकोस. मी याला उचलून स्मशानांत नेतों तिथं याचं दहन करून यथाविधि क्रिया करूं.

**तारा०**—काय ? माझ्या बाळाचं दहन ! महाराज, आपणच सांगा. कोणत्या आईनं आपलं एकुलतं एक लाडकं मूल आपल्या हातानं चितेवर ठेवलं आहे बरं ? नको–नको त्या असल्या आईचं जिणं !

**विश्वा०**—तें सगळं खरं; पण आलेला प्रसंग तर निभावला पाहिजे ना ? त्यांतून अशा काळोख्या रात्रीं, हें प्रेत घेऊन तूं या भयंकर ठिकाणीं किती वेळ बसणार ? बरं, रात्रंदिवस तूं याला घेऊन बसलीस म्हणून गेलेला जीव थोडाच फिरणार आहे ? चल दूर हो; मी याला उचलून नेतों.

**तारा०**—नेतां ! आईपासून लेकरूं नेतां ! न्या ! पण मी माझ्या बाळाला एकदां डोळे भरून पाहतें आणि प्रेमानं शेवटचं कुरवाळतें तरी !

**विश्वा०**—वेडी आहेस. प्रेताला कुरवाळण्यांत काय अर्थ आहे ? चल, वेळ गमावूं नकोस. तूं निराश्रित अबला. प्रेतदहनाचा कर देण्याची तुझी ऐपत नाहीं.

अशा वेळीं माझ्या सांगण्याप्रमाणं वागून, याच्या प्राणाची सुटका कर. जा रे तुम्ही सर्व तयारी करा; तोंपर्यंत मी हें प्रेत घेऊन येतों. (शिष्य जातात.) तारामति, आतां रडूं नकोस.

**तारा०**—हें मीं आपलं मन आवरलं. पण, माझ्या बाळाला हळू उचला बरं. तो आमचा जीव कीं प्राण होता !

**विश्वा०**—होता ! पण आतां काय त्याचं. [ प्रेत उचलतो.

**तारा०**—

**आठवुं मनिं या । किती सुगुण तव तनया । हाय !**
**माया कशी आज नेशी लया ॥**
**नाहिं मोडियलें वचन कधीं गुणिराया ॥**
**सत्व राखाया कष्टविशी निज काया ॥**
**आज मातेला लावियलें रडायला ॥**
**सांग सुकुमारा साहुं कशी विरहा या ॥**
**हाय सदया काय न दया । आलि हृदया॥**

[ विश्वामित्र व तारामती प्रेत घेऊन जातात, तोंच शिष्य येतात.

**१ शिष्य**—काय रे, गड्यांनो, आतां ही तारामती त्या पोराला जाळीत बसणार, पण आमचं पोट कसं जळणार ?

**२ शिष्य**—अरे, आज शिवरात्र समजावी—झालं.

**३ शिष्य**—आतां तेंच नशिबीं आलं आहे ! बेटा मेला तर मेला पण आमचं जेवण झाल्यावरहि मेला नाहीं. खरंच, हे मरणारे लोक दुसऱ्याची सोय-गैरसोय मुळींच पहात नाहींत !

**१ शिष्य**—लहर लागेल तेव्हां मरतात !

**२ शिष्य**—अरे जाऊं दे रे बाबा ही कटकट !

**मरणारे ते मरोत बेटे पर्वा त्यांची अम्हां नसे ॥**
**१ ला—काळवेळ परि पाहुनि मरणें मूर्ख खरे नेणती कसें ॥**
**३ रा—भलत्या वेळीं प्राण सोडणें प्राणसंकटापरी दिसे ॥**
**१ ला—रात्रीं अपरात्रीं तडफडणें अशास लागे खूळ जसें ॥**

**३ रा--उपवास पाडिती लोकां । हे तसे ।**
**१ ला--घरकामीं मोठा धोका । येतसे ।**
**३ रा--अति देति कष्ट कित्येकां । शत्रुसे ।**
**१ ला--लग्नकार्य हे हटकुन अडविति मुहूर्त यां मरण्यास नसे ।**
**३ रा--देती ओझें जना फुकाचें स्मशानीं न हे मरति कसे ॥**

---

## प्रवेश ४ था

( **स्थळ–स्मशान**--तारामती, हरिश्चंद्र, विश्वामित्र, वगैरे )

**विश्वा०**—अरे ए, स्मशानरक्षका, गुलामा झोंपलास काय ? ती पहा, कोणी स्त्री, कर दिल्यावांचून प्रेत दहन करीत आहे. तर चल, हो पुढं. ओढ तें प्रेत बाहेर.

**हरि०**--(प्रेत बाहेर ओढून) हा दुष्टे. प्रेतदहनाचा कर चुकवण्याकरितां खोटं कर्म केलंस. हें पाप कुठं फेडशील ?

**तारा०**--हाय रे दुर्दैवा ! शेवटीं इथंहि दावा साधलास ना ? बाळा, जिवंतपणीं तुला सुख नाहीं तें नाहींच, पण तुझ्या प्रेताची देखील अशी विटंबना व्हावी ना ? महाराज, आपण कुठं आहांत हो ! या–धांवत या–आणि ज्या बाळाचे आजपर्यंत लाड पुरविलेत त्याची अवस्था तरी पहा !

**हरि०**—अरे ! हा आवाज माझ्या चांगलाच ओळखीचा दिसतो ? भगवंता, माझे कान तर फुटले नाहींत ना ? प्रलयकालच्या झंझावायूप्रमाणं, हा आवाज माझ्या कानाशीं घुमतो आहे ! कडकडीत तेलाप्रमाणं, हिचे शब्द माझ्या हृदयाला पोळताहेत ! प्रिये, वत्सा, या वेळीं तुम्हीं कुठं आहांत ?

**तारा०**—आकाश फाटलं, ठिगळ मारूं कुठवर ? घर कोसळलं तें सांवरूं तरी कसं ? रडून रडून डोळे कोरडे पडले–आतां अश्रू आणूं कुठून ! आणि कंठ दाटून आला–आतां बोलूं तरी काय ? माझ्या हृदयांत असलेली प्राणेश्वराची मूर्ति मला विचारते कीं, माझा लाडका रोहिदास दाखीव. पण काय सांगूं ? कोणतं उत्तर देऊं ! आतां कुठचा रोहिदास दाखवूं ? माझा प्राण चालला रे देवा !

[ मूर्च्छित पडते.

**हरि०**—झालं. शेवटीं ब्रह्मांड कोसळलं! ही माझी तारामतीच खास! हाय! आतां करूं तरी काय? हिचं दुःख पाहून रडूं कीं, माझ्या जिवाचा कलिजा रोहिदास गेला म्हणून रडूं? दुःखाचा कडेलोट झाला! तारामती, ऊठ—ऊठ कशी.

**तारा०**—मला कुणीं हांक मारली? दिसत तर कोणीच नाहीं, आणि मग तोच गोड आवाज कुठून बरं ऐकूं आला? मला भ्रम तर नाहीं ना झाला? छेः, ऐकलं तर खरंच. तर मग कुठं आहांत हो आपण?

**हरि०**—हा चांडाळ तुझ्या जवळच आहे.

**तारा०**—चांडाळ? खरोखरच चांडाळ! माझ्या तान्ह्याची दुर्दशा करणारा चांडाळ इथं आहे खरा.

**हरि०**—खरोखरच मी चांडाळ? छे! त्यापेक्षां देखील मी पाषाणहृदयी बनलों आहें.

**तारा०**—तर मग त्यावर मला डोकं आपटूं द्या. म्हणजे तरी माझा प्राण जाईल.

**हरि०**—भगवंता सूर्यनारायणा, तूं तर या वेळीं आपले डोळे मिटले आहेसच, पण तुझे कानहि मिटले का रे? स्वर्गस्थ पूर्वजांनो, या तुमच्या वंशजाची—हरिश्चंद्राची हीन स्थिति तुम्हांला दिसत नाहीं काय?

**तारा०**—आपणच का हो हे? ओळखलं बरं मीं आतां! पण असे कसे हो तुम्ही? हा नीच वेष तुम्हीं का घेतला? बायकोला भेटायला हा भयंकर वेष कां घ्यावा लागतो? दुःखी कष्टी स्त्रीचं समाधान करायला, मांगाचं स्वरूप का धरावं लागतं? आपल्या लाडक्याची तब्येत बघायला चांडाळ—कसाई का व्हावं लागतं?

**हरि०**—दे—दे—जितकीं कठोर विशेषणं—वाटेल तशा शिव्या—हवेत ते भयंकर शाप दे.

**तारा०**—कुणाला? आपल्याला कां शाप देऊं? जळो ही जीभ. ती झडून पडो. मीं चांगलं ओळखलं बरं. पण महाराज, तुम्हीं या भयंकर स्मशानांत कोणीकडे?

**हरि०**—आपल्या दैवदुर्विपाकाला बळी पडलों आहें. तारामति, तूं रडूं नकोस. हृदय कठीण कर. जिवाला धीर दे. मी आतां जाऊन येतों.

**तारा०**—नाहीं-नाहीं. आतां मला सोडून आपण कुठंहि जाऊं नये.

**हरि०**—तारामति, हल्लीं आपण कोणत्या स्थितींत आहोंत, हें तूं विसरलीस काय? अग, तूं पराधीन, मी पराधीन. आपल्याला धन्याच्या हुकमानंच वागलं पाहिजे.

**तारा०**—म्हणजे आपण काय म्हणतां तेंच मला समजत नाहीं.

**हरि०**—सध्यां मी वीरबाहू डोंबाचा दास आहें, आणि त्यानं माझ्याकडे स्मशान-रक्षकाची कामगिरी सोंपविली आहे. अर्थात्, प्रत्यक्ष पोटच्या मुलाचंहि प्रेत धन्याला सवा रुपया कर दिल्यावांचून जाळतां येणार नाहीं. तेव्हां प्रेत-दहनाची आज्ञा आणीपर्यंत, तूं या शवाचं रक्षण करीत बैस.

**तारा०**—अगबाई! या भयंकर स्मशानांत मी एकटी बसूं तरी कशी?

**हरि०**—बसलंच पाहिजे. तारामति, आपल्यावर दुःखाचा पर्वत कोसळला तरी धैर्य सोडतां येत नाहीं. आपण क्षत्रिय-त्यांत दुसऱ्याचे दास, तेव्हां कर्तव्याला चुकतां येत नाहीं आणि आत्महत्त्याहि करतां येत नाहीं. प्राण जाईपर्यंत प्रसंग भोगलेच पाहिजेत. मग परमेश्वराला केव्हां करुणा येईल ती येवो.

**तारा०**—बरं तर. आपण लवकरच परत यायचं.

**हरि०**—हा आलोंच, घाबरूं नकोस. भगवंता—

**तुज नमितसें स्मशाननाथा॥ एकटि संकटिं सोडि**
**प्राणसखि दड दड दड दड धांव बा आतां॥ तुज०॥**
**प्रभुवर तववर कृपाकर असो॥ हीन दीन शीणहीन**
**बा कर धड धड धड धड पेट चिंता॥ नमि०॥**
**स्मरहर सुरवर श्री गिरिजापति। शंकरा सुरासुराव-**
**रांकित कड कड कड कड कड—संकटा। हो अतां।**
**वारिता। स्मशाननाथा॥**

[ तारामती प्रेताजवळ बसते व हरिश्चंद्र जातो. तोंच विश्वामित्र येतो.

**विश्वा०**—उत्तम झालं. रोहिदासाचं प्रेत हरिश्चंद्राकडून सरणांतून ओढून तर काढवलंच. आतां, प्रेतदहनाची परवानगी मिळविण्यासाठीं हरिश्चंद्र डोंबाकडे गेला आहे आणि तारामती प्रेताचं रक्षण करीत बसली आहे, अशा संधींत हरिश्चंद्र परत येण्याचे पूर्वीं, तारामतीला मंत्रसामर्थ्यानं निद्रावश करतों. आणि

रोहिदासाचं पोट फाडून, त्याचीं आंतडीं तारामतीच्या गळ्यांत अडकवून, तिला पोरं खाणारी लाव बनवतों. मग पाहतों, तारामतीचं धैर्य कसं टिकतं आणि सत्त्व कसं राखलं जातं तें ? [ जातो.

---

## प्रवेश ५ वा

### ( डोंबाचें घर–हरिश्चंद्र, डोंब, म्हशा वगैरे )

**डोंब**—बस्स. तें कायबि व्हनार न्हाई. सव्वा रुपया कर घेतल्याबिगर, एक वखत जाळलेला मुडदाबी जाळाया देनार न्हाई.

**हरि०**—पण स्वामी, त्या मुलाची आई फार गरीब आहे.

**डोंब**—गरीब हाई तर आपला मुडदा जाळतिया कशापाई ? कोल्याकुत्र्यांच्या म्होरं कां टाकीत न्हाई ?

**हरि०**—छेः छेः, त्या बाईला तसं करतां येत नाहीं, आणि तिच्याजवळ या वेळीं एक पैसा देखील नाहीं.

**डोंब**—हन्या, तुला ल्योका पाचपेच कसा त्यो अगदीं ठावा न्हाई बघ. अर बाबा, या आवांचा कावा तुला न्हाई ठावा. तो समदा या ईरबाहूला इच्यारून घ्येवा. अर, या आवा म्हंजी भाइर एक दावत्याती आन् आमंदी न्यान्याच असत्याती.

**हरि०**—नाहीं स्वामी, ती बाई तशापैकीं नाहीं याबद्दल मी खात्री देतों.

**डोंब**—अरच्या ! त्या बाईची तुजी ओळख ना पाळख, अन् तिची खात्री देया तूं का जोतिशाचा मुलगा आहीस व्हय ? चल जा. गुमान आपल्या कामाला जा.

**हरि०**—आज्ञा स्वामी, पण आपली परवानगी आणतों म्हणून मी त्या बाईला वचन देऊन चुकलों आहें.

**डोंब**—हतंच तर तुमावानी आडान्याचं चुकतंया. अर बाबा, पैक्याचा कामांत असं कुनाला वचन बिचन द्येव न्हाई. तुला येक न्याव सांगतों. हमालावानी खपून मिळवावं अन् मंग राजावानी बसून उधळावं. म्यां तसं मिळवलं व्हतं म्हनून तर तुला इकत घेया गवसलं.

**हरि०**—खरं आहे स्वामी. माझ्यावर आपले मोठे उपकार आहेत. तसेच त्या बाईवरहि उपकार करावे.

**डोंब**—आरचिभन्, त्या बाईची तूं लईशी तरफदारी करतुंया ? तिच्या संगतीं म्होतूर बितूर लावायचा तर बेत ठरला न्हाई ? ह्यें बघ इन्या, तुज्यावानी घा इस मानसासनी इकत घेईन, पन याकबी मढं फुकट जाळायला देणार न्हाई. अर बाबा, माजाबी मुडदा मोफत जाळायचा न्हाई असं तर म्यां पोराबाळासनीं सांगुनशान ठेवलंया.

**शिष्य**—( धापा टाकीत धांवत येतो. ) अरे घांवा, पळा, लपा, दडा आणि आपापले प्राण वांचवा ! गांवांत लांव आली आहे लांव !

**डोंब**—काय म्हंगता बामन बुवा ? लांव आलीया ?

**शिष्य**—अरे होय रे बाबा, होय ! गांवांत लांव आली आहे आणि ती भराभर माणसं खात सुटली आहे. माझं कुंकू सबळ म्हणून माझ्या बायकोचे प्राण वांचले.

**विश्वा०**—( घाईनें येतो. ) कोण आहे रे इथं ! वीरबाहू डोंब म्हणतात तो तूंच का ? तर मग जा गुलामा, अगोदर धांवत जा. काशिराजानं, गांवांत पोरं खात असलेल्या लांवेला ठार मारण्याची तुला आज्ञा केली आहे. पळ, पळ लवकर.

**डोंब**—कशापाई पळ ? त्या भिकारड्या लांवंला मारायला ह्यो ईरबाहू डोंब कशाला होवा ? मोठा थोरला राकुस आला मंग मी हाईच. म्हशा, जा ल्योका त्या लांवंचीं खांडोळी खांडोळी उडउनशान टाक.

**म्हशा**—नगर बाबा–नग ! त्यें आपल्या बाऱ्यानबि व्हायाचं न्हाई ! त्या लांवंनं मलाच खाऊनशान टाकलं तर माजी बायको उगडी पडल का.

**डोंब**— हात् लेकाच्या बायल्या ! तुज्यामंदी मरदपणा कसा त्यो न्हाईच. चंद्या, तलवार कशी वापरावी हें तुला ठावं हाय का रं मर्दा.

**हरि०**—हो हो. चांगल्या कामांत मीं पुष्कळदां तरवार मारली आहे. तरवारीचा सदुपयोग हा हरिश्चंद्र उत्तम जाणतो.

**डोंब**—तर मंग जा बेगी बेगी. या तलवारीनं त्या लांवंचं, एक घाव दोन तुकडं करूनशान टाक.

**हरि०**—आज्ञा स्वामी.

**डोंब**—बघ त्योका म्हशा, त्यो कसा मरद हाई? न्हाई तर तूं-कुचकामाचा हायेस बेट्या.

त्यो कसा हिरा फांकडा बोल रोकडा बडा दिलदार ॥
लई अकडबाज जनुं उमदा बघ दिसतुंया सरदार ॥
तूं हाईस जुना चाकुर खाशि भाकुर परि न मगदूर ॥
काम टाकुनी पळशि दूर मंग करिशी कुरकुर ॥
त्यो हुशार कामामंदि चुकना कंदि करि न दरकार ॥
तुला सांगतां म्होरा करिशी तुटकं ख्येटार ॥
त्यो कसा इमानी गडी मारितो उडी कडी तुजवर ॥
तूं काम चुकारू अडेल तट्टू थूः तुझ्या तोंडावर ॥

---

## प्रवेश ६ वा

( **स्मशान**-हरिश्चंद्र, तारामती, यमधर्म, विश्वामित्र, वगैरे )

**हरि०**—( तारामतीचे, केस धरून ) हा दुष्टे, मनुष्यभक्षक चांडाळणी, हा हरिश्चंद्र स्मशानरक्षक असतां, तूं इथं यायचं धाडस केलंस काय?

**तारा०**—अग आई ग! सोडायची मला. केसांना कळ लागली.

**हरि०**—कळ लागली? पण डाकिणी, तुझ्या भयंकर कृत्यानं कित्येकांच्या आत्म्यांना कळ लागली असेल त्याचा विचार केलास?

**तारा०**—कसला आणि किती विचार करूं? या पापिणीनं प्रत्यक्ष एकुलतं एक पोटचं पोर—

**हरि०**—तेंहि खाल्लंस ना? धिःकार असो तुझ्या जिण्याला. तर मग पुत्रघातिनी, चल हो मरायला तयार.

**तारा०**—ही मी तयार आहें. पण मला माझ्या इष्ट देवतेची प्रार्थना करूं द्या. प्राणनाथ—प्राणेश्वरा?

**हरि०—**काय? प्राणनाथ—प्राणेश्वरा?

**तारा०**—हो, अजून नाहीं बरं तो संबंध सुटला. आणि जन्मजन्मांतरींहि सुटणार नाहीं. मी पायांची दासी—

**हरि०**—कोण ? माझी लाडकी तारामती ! देवा ! या वेळीं प्राण जातील तर बरं होईल !

**तारा०**—असं म्हणूं नये. 'जन्मोजन्म मी तुझा' असं म्हणावं आणि खुशाल माझा प्राण घ्यावा.

**हरि०**—केवढा मी पापी–अधमाधम–चांडाळ—

**तारा०**—हें काय ? आज भलभलतं काय बोलतां महाराज ?

**हरि०**—भलमलतं कसं ? ज्याला राक्षसी–पिशाच्च–कर्म म्हणतात, तें करायला मीं कुठं चुकलों ? तारामति, तुझा प्राण मीं घ्यावा, असं ब्रह्मदेवानं कोणत्या भिकार चोपड्यांत लिहिलं होतं कोण जाणे ?

**तारा०**—हें जर खरं असेल, तर ब्रह्मदेव खरंच दयाळू !

**हरि०**—मोठा दयाळू ! ब्रह्मदेवानं हुकूम केला, लेखणीच्या एका फटकाऱ्या-सारशीं चित्रगुप्तानं वाक्य लिहिलं; पण तें दुष्ट कर्म मला किती अवघड जाईल, याचा विचार कुणीच केला नाहीं.

**तारा०**—तर मग देवच पावला म्हणायचा ! पतीच्या हातून मरण येण्यांत स्त्रियांना धन्यता वाटते. पण महाराज, कोणत्या पुण्यवंतानं माझ्यावर हा उपकार केला ?

**हरि०**—हा उपकार ! मग अपकार तरी कोणता ? निरपराधी दुःखी कष्टी स्त्रीचा प्राण, तिच्या पतीकडून घ्यायला लावणं हा कसला उपकार ? पण तारामति, तुझ्या गळ्यांत काय आहे हें ? हा कोणत्या मुलखाचा, कोणत्या नीच योनींतला अलंकार ?

**तारा०**—माझ्या गळ्यांत ? कुठं ? अग बाई ! काय हें अमंगळ. [पडते.

**हरि०**—तारामति, सावध हो--सावध हो. अथवा नकोच. सावध होऊन तरी पुन्हां तूं माझ्या हातून मरणार आणि स्त्री–हत्त्या मला घडणार ? त्यापेक्षां लाडके, तूं अशीच्या अशीच–जागच्या जागीं–पण छे, स्त्रीवध माझ्या हातून होऊं नये, एवढं कुठं माझं भाग्य असणार ?

**तारा०**—( उठून ) माझ्या गळ्यांत कुठं काय आहे बरं ? हें तर मंगळसूत्र. आणि तें आपणच बांधलंत ना ?

**हरि०**—मी मूढ बनलों आहें. मला-मला कांहीं कळत नाहीं. पुण्यवान् बालक रोहिदास तिकडे छिन्नभिन्न होऊन पडला आहे. त्याचींच आंतडीं पुत्रवत्सल अशा माझ्या प्रिय पत्नीच्या गळ्यांत-याला म्हणूं तरी काय ? हें स्वप्न ? दुर्दैवाचा खेळ ? कीं मायेचा अघटित बाजार ? तारामति, तुझे हात पहा बरं. त्यावर हे डाग कसले ?

**तारा०**—तारामतीच्या हाताला डाग ? अरे देवा ! माझ्या नखाला डाग लागला तर मी प्राण ठेवायची नाहीं, मग हे हातावरचे डाग कसे सहन करूं ? हाय ! कसे, अगदीं लाल--विस्तवासारखे दिसताहेत ! आई ग ! माझे हात जळूं लागले ! तोडा तोडा—हे मेले हात !

**हरि०**—हाय हाय ! विधात्या, प्रत्यक्ष आपल्या प्रिय पत्नीचा अंत मीं करावा, असं जें माझ्या दैवी लिहिलंस तें काय म्हणून ? कृतान्त काळ जो यमधर्म त्याच्यापेक्षां देखील मी तुला भयंकर वाटलों काय ? यमधर्मा, तुझा अधिकार मी घेऊन तूं पदभ्रष्ट व्हावंस, हें तुलाहि संमत आहे ना ? ठीक आहे. धर्मराजा, आतां तूं तरी संतुष्ट हो.

**तारा०**—आपल्या हातून धर्म राखला गेला, म्हणजे ती धर्ममूर्ति आपली पाठिराखीच आहे. धर्मच आपलें दैन्य हरून, विजय मिळवून देईल. दिसंतें तें सर्व मावळेल, पण धर्मच आपला सोबती होईल. म्हणून म्हणतें, प्राणनाथ, धर्म राखा, धर्म राखा !

**हरि०**—खरं आहे. तारामति, मान पुढं कर. मी धर्माचा सेवक-धर्माज्ञाच पाळणार.

**तारा०**—माझी तयारी आहे. पण आपला हात कां बरं कांपतो ? अगबाई ! सर्वांगाला हें कापरं कसलं भरलं ? आणि डोळ्यांना पाणी काय म्हणून आलं ?

**हरि०**—उंः ! तें सर्व संतापाच्या अतिरेकामुळं. तिकडं तूं पाहूं नकोस, आपली मान पुढं कर. परमेश्वरा, भगवान् सूर्यनारायणाप्रमाणं तूंहि आपले डोळे झांक. यमधर्मा, तुला लाजवील असा हा दुसरा यम उत्पन्न झाला आहे. आतां तूं खुशाल विश्रांती घे. राक्षसांनो, तुम्ही आपलीं तोंडं-जमिनींत-गुहेंत-

जिथं जागा सांपडेल तिथं खुपसा. तुम्हांला करतां येणार नाहीं. असं अघोर कर्म या वेळीं मी करीत आहें. अहो स्मशानवासी भूतपिशाच्चांनो, तुमची गडबड बंद करा. माझ्यापेक्षां भयंकर कर्म तुम्हांला मुळींच करतां येणार नाहीं.

**तारा०**—हें काय ? असं नाहीं नाहीं तें बोलून, माझ्या यातना कां बरं वाढवितां ?

**हरि०**—तूं आतां कांहीं बोलूं नकोस, माझ्याकडे पाहूं सुद्धां नकोस. आपलं सर्व लक्ष त्या दयाघन परमेश्वराकडे लाव.

**तारा०**—माझे परमेश्वर आपणच ! आपले पाय सोडून माझं लक्ष कुठंहि जाणार नाहीं. हें मीं आपलं मस्तक चरणार ठेवलं.

**हरि०**—तें परमेश्वराला अर्पण असो. हं आटप. घे देवाचं नांव.

[ तारामतीचे केस धरून हरिश्चंद्र तरवार उगारतो.

**तारा०**—

**प्रभु तुम्हांविण कुणा स्मरुं मी ॥ जन्मजन्मीं ॥**
**मज तुम्हिच देव तुम्हिच सर्व, मजवरि**
**दया करा, हरा भया, झडकरि वधुनि स्वामि । प्रभु० ॥**
**रमणकरें ये मरण सतीला ॥ याहुनि मोक्ष दुजा कसला ॥**
**म्हणुनि चरण-धरुनी तरि वरा दया,**
**हरा भया झडकरी वधुनि स्वामि ॥ प्रभु० ॥**
**भ्रांति टाकुनि शांति धरा हो खंति करूं नका गुणवंता ॥**
**अंति एक होऊं राहुं संतत सदाशिवा उमाधवा चिंतित**
**अढळधामिं ॥ प्रभु० ॥**

**हरि०**—

**शंभो झणिं धांव पाव रे ॥ शंभो ॥ स्त्री-वध हें कर्म घोर ॥**
**घडत करीं पाप थोर ॥ दैवयोग करित जोर ॥ भोग नावरे ॥**
**दाविं त्वरित दिव्य पाय ॥ सांग काय करुं उपाय ॥**
**तूंचि गुरू बाप माय ॥ हाचि भाव रे ॥**
**नरकवास ये कपाळिं ॥ दूर करुनि, प्रतिपाळी ॥**
**दयाघना चंद्रमौळी ॥ राखिं नांव रे ॥**

[ धर्म प्रगट होऊन तरवार धरतो.

**धर्म०--**

धन्य धन्य नृपवरा। धन्य तूं आंवरि आंवरि करा
दुर्जनतम-संहरा॥ भास्करा॥ प्रताप तेजें भरो
दिगंतर यशध्वजें ही धरा। नीति सुगुणमंदिरा॥
सुंदरा॥ प्रजाजनाचा चिदानंद तूं वंद्य सुरा-
सुरनरा॥ सत्त्वधीर सागरा॥ भूधरा यावच्चंद्र-
दिवाकर तोंवरि जगन्मान्य हो खरा॥

**हरि०**—काय ! माझं हीन कर्म पाहून, पिशाच्चांनाहि लाज वाटली ! आणि शस्त्र धरून त्यांनीं असल्या दुष्कृत्याचा प्रतिकार केला ?

**नारद**—( प्रवेश करून ) नाहीं-नाहीं महाभागा, मागं पहा. मूर्तिमंत धर्मराजच तुझे पाठिराखे झाले आहेत. पहा तर खरं.

**हरि०**—काय ? प्रत्यक्ष धर्ममूर्तीनं या दीनाकरतां श्रम घेतले ? भगवन् ! आपल्याला प्रणाम असो.

**धर्म**—उदारचरित् राजा हरिश्चंद्रा, महापतिव्रते तारामती, तुम्ही धन्य आहां. प्राणान्त व्हायची वेळ आली असतां, धर्मानं आंखून दिलेला सन्मार्ग न सोडतां आपलं आचरण निर्मल ठेवलंत, म्हणूनच स्वतःचा धर्म राखण्याकरतां, मला इथं यावं लागलं.

**हरि०**—याचं सारं श्रेय भगवंताकडेच आहे. मुलांचा थोरपणा पिताच वाढवितो.

**वसिष्ठ**—( प्रवेश करतो ) वत्सा हरिश्चंद्रा, वत्से तारामति, तुमचा विजय असो.

**हरि० तारा०**—कुलगुरूंना आमचा प्रणाम असो.

**विश्वा०**—( प्रवेश करतो ) राजा हरिश्चंद्रा, आपला जयजयकार असो.

**हरि० तारा०**—भगवन्, आपल्याला आम्ही अभिवंदन करतों.

**विश्वा०**—देवी तारामति, पतिव्रतांत तूं धन्य आहेस; तुझी थोरवी किती वर्णन करावी ?

**तारा०**—पण महाराज, माझा बाळ रोहिदास कुठं आहे ?

**विश्वा०**—तो जवळच आहे. हांक मार, म्हणजे तुला येऊन भेटेल.

**तारा०**—बाळा रोहिदासा, ये—रे—ये माझ्या लाडक्या ? कुठं रे आहेस तूं ?

**रोहि०**—हा पहा मी तुझ्याजवळच आहें. [ धांवत येऊन भेटतो.

**तारा०**—बाळा, तूं परत कसा आलास ? आणि इतका वेळ आम्हांला सोडून तूं राहिलास तरी कसा ?

**रोहि०**—आई, भगवान् विश्वामित्रऋषीजवळ मी अभिमंत्रित धनुर्विद्या शिकत होतों. महाराज, त्यांच्यासारखे थोर, दयाळु सर्वज्ञ तेच.

**तारा०**—तर मग तें प्रेत कुणाचं ?

**विश्वा०** —अर्थात् तें मायेचं ! साध्वी, महाभागा, तें सर्व कांहीं मींच केलं.

**स्वप्नीं आलों त्वदिय नृपते घेतलें राज्य सारें ॥**
**दावाग्नीनें विघडुनि तुम्हां गांजिलें मींच बारे ॥**
**सत्वासाठीं अहि बनुनियां मारिलें मीं कुमारा ॥**
**लांवी केलें सतिस जगतीं, खेळ माझाच सारा ॥**

**नारद**—खेळ यांचाच सारा !

**विश्वा०**—नाहीं महाराज ! हा आपलाच पसारा.

**हरि०**—तर मग भगवान्, आपण या शिष्याची परीक्षाच घेतलींत. आपल्यासारखे परीक्षक जन्मोजन्म भेटावेत, हीच या दासाची इच्छा.

**विश्वा०**—म्हणूनच मी तुम्हांला धन्य म्हणतों. राजा, कुलगुरु वसिष्ठऋषीप्रमाणें मी आजपासून तुझ्या कुलाचा हितचिंतक झालों आहें. असो. इंद्राच्या दरबारांत प्रतिज्ञा केल्याप्रमाणं, साठ सहस्र वर्षें लोहपिष्ठ भक्षण करून जी तपश्चर्या केली तिचं फळ तुला अर्पण करूं दे. हात पुढं कर.

**हरि०**—पण महाराज, मी डोंब्याच्या घरच्या हीन सेवेनं दूषित झालों आहें.

**धर्म**—नाहीं--नाहीं. राजा, तूं सर्वज्ञ आणि मला ओळखलं नाहीं ? अरे, मी धर्म म्हणजेच डोंब आणि निष्ठा म्हणजे डोंबीण. आम्ही दोघांनींच डोंब–डोंबणीचा वेष घेतला होता. अर्थात् तुझ्या हातून अधर्म घडणार कसा ? तारामति, कालकौशिक म्हणजे प्रत्यक्ष काशीविश्वेश्वर होते.

**हरि०**—अहाहा ! तर मग केवढं आमचं महद्भाग्य.

**विश्वा०**—तें काय सांगावं. तुम्ही थोर, सत्यप्रतिज्ञ आहांत. तुमच्या सत्व-धीरपणाचं वर्णन करायला मी असमर्थ आहें. वसिष्ठमुने, मला वाटतं आधीं अयोध्येंत जाऊन हरिश्चंद्राला राज्याभिषेक करावा.

**हरि०**—पण महाराज, मीं एक वेळ दिलेलं राज्यदान परत कसं घ्यावं ?

**धर्म**—छेः छेः ! राजा, तूं राज्यदान दिलं नाहींस आणि विश्वामित्रऋषींनीं तें घेतलंहि पण नाहीं; घडलेला सर्व प्रकार केवळ मायेचा भास होय. त्यांत सत्य असं कांहींच नाहीं.

**हरि०**—तर मग भगवान्, हा मायेचा भास कळून आल्यामुळं, आतां या क्षणीक वैभवाचा मला कंटाळा आला आहे. तेव्हां वत्स रोहिदासाला राज्याभिषेक करून, कुलपरंपरा चालत आलेली तपश्चर्या करावी, असा माझा मानस आहे.

**तारा०**— माझीहि तशीच इच्छा आहे.

**धर्म**—तथास्तु. धर्ममार्गच हा.

**विश्वा०**—पण राजा, तुम्हीं उभयतांनीं राजवेष परिधान करावा. कुमाराचा राज्याभिषेक-सोहळा आनंदानं पहा आणि नंतर तुम्हांला वाटेल तसं करा. चला आतां अयोध्येंत. वसिष्ठऋषी, अहो नारदमुनी, असंच ना ?

**नारद**—अक्षरशः असंच. हरिश्चंद्राचं यशोवर्णन करीतच जाऊं या.

**धर्म व नारद**—

**धन्य तूं खरा । जगीं धन्य नृपवरा । हरिश्चंद्र नृपवरा ।**
**सदय शुभंकर । सरलउदारा । दीनजनानंदपरा । हे गुणाकरा ॥**
**स्वप्नवचास्तव राज्य दिलें त्वां । स्त्री-सुत निज तनुही**
**विकिली । सत्वसागरा ॥ विमल सुमंगल चरित-गुणानें**
**स्वकुलासह शोभविली । ही वसुंधरा ॥**

[ जातात

## प्रवेश ७ वा

[ दरबार—रोहिदासाला सिंहासनावर बसवून देव, गंधर्व, ऋषी, अप्सरा वगैरे मंगल आशीर्वाद देतात.

**सुखी राहीं कुमारा। विजय असो त्वदिय बालवीरा॥**
**गुणसारा॥ दानशूरा। सदैव शांति दे प्रजेसी थारा॥**
**सत्वधीर सूर्यकुलानंदा उदारा॥ तुज लाभो सुपुत्र-**
**दारा॥ रणधीरा, बहु चतुरा गंभीरा, नृपकुमरा॥**

[ हरिश्चंद्र, तारामती राजवेषानें येतात.

**विश्वा०**—असो; राजा, झालं तें सर्व मंगलच झालं.

**नारद**—पण एक राहिलं. अद्याप तपश्चर्येचं पुण्य नाहीं अर्पण केलं?

**विश्वा०**—अहो, तें सर्व अर्पण केल्याशिवाय का मी राहणार आहें.

**नारद**—( स्वगत ) न करून सांगतां कुणाला? ( उघड ) मग उशीर कां?

**विश्वा०**—राजा, मीं साठ सहस्र वर्षें लोहपिष्ठ भक्षण करून जी तपश्चर्या केली तिचं पुण्य तुला संतोषानं अर्पण करितों, हात पुढं कर. ( उदक सोडतो. ) आतां तुम्हां सर्वांची इच्छा कळवा, पूर्ण करणारी धर्ममूर्ति आहेच.

**हरि०**—आम्हां सर्वांच्या मनांत धर्म जागृत असावा, धर्मभ्रष्टता होऊं नये; जन्मोजन्म आपलाच सहवास घडावा आणि अशींच प्रिय माणसं सदोदित लाभावीं.

**विश्वा०**—तारामति, तुझी इच्छा काय आहे?

**तारा०**—भगवान् हरिश्चंद्रासारखे पती, रोहिदासासारखा पुत्र, वसिष्ठासारखे कुलगुरु आणि विश्वामित्रासारखे याचक भेटावेत.

**रोहि०**—आणि मलाहि, अशाच मातापितरांच्या पोटीं जन्म यावा आणि आपणासारख्या सद्गुरूंचा सहवास घडावा.

**धर्म**--तथास्तु. तुमच्या शीलाला शोभेल असंच मागणं आहे. भगवान् श्री काशीविश्वेश्वर तुमचे मनोरथ पूर्ण करील. आतां आणखी तुमची काय इच्छा आहे ?

**सर्व**--

**दे दे प्रभु नाम गोड जोड हीच दे दे ॥ भवपरिहर-विमल-चरणकमलस्मरण दे दे ॥ आवड तव गुणगायनिं। सत्यसुधा वसुं आननिं ॥ कठिण अरुचिकर भाषणीं। वदुं न कधिं विनोदें ॥ संतसंग घडवि सदा। कुजनिं वास घडुं न कदां ॥ गर्व अहंतादि मदा। हृदयिं येउं ने दे ॥**

